### 23.9. Financial Incentives for amphibian buses, fishing vessels, harbour/river cruises and Floating Cottages

(a) A 25% concession on Port Dues payable by amphibian buses, fishing vessels, harbour/river cruises and Floating Cottages will be provided.

(b) A 75% concession on passenger levy for tickets issued to customers will be provided for a period of three years.

(c) In addition to the concession in (b) above, additional concessions will be available to Persons with Disabilities as per the prevalent policy of the State Government in this regard.

### 23.10. Equity Participation

(a) Wherever MMB or State Government as the case maybe is planning to or has entered into a concession agreement or shareholding agreement or lease agreement and such agreement provides for an option of equity participation by MMB / State Government, in such cases – Incentives (eligible and opted for) by the project proponent (Government or Private), will be considered as an equity participation to the extent of share of equity as defined in the agreement.

(b) Provided that the option mentioned in clause 23.10(a) may not be exercised by MMB/State Government for the concession agreement where the period to subscribe for the equity participation has lapsed as specified in the concession agreement unless the Existing Project undertakes expansion and is eligible for financial incentives as per clause 23.3.

शासन निर्णय क्र. धोरण -१२२१/प्र.क्र.५८/बंदरे-१,
दिनांक १८.०८.२०२३ सोबतचे परिशिष्ट-२

# महाराष्ट्र सागरी विकास धोरण, २०२३

## महाराष्ट्र शासन

## गृह विभाग (परिवहन व बंदरे)

## एक्रोनिम्स

| | |
|---|---|
| बीओटी | बांधा, वापरा आणि हस्तांतरित करा |
| सीएनजी | संकुचित नैसर्गिक वायू |
| DBOOT | डिझाइन, बांधा, मालकी, वापरा आणि हस्तातंरित करा |
| DCRTF | डेकार्बोनायझेशन आणि क्लायमेट रेजिलियन्स ट्रस्ट फंड |
| डीपीआर | तपशीलवार प्रकल्प अहवाल (डीपीआर) |
| EIAR | पर्यावरणीय प्रभाव मूल्यांकन अहवाल |
| एक्झिम | निर्यात आयात |
| FCI | स्थिर भांडवली गुंतवणूक |
| FTWZ | फ्री ट्रेड वेअरहाउसिंग झोन |
| GPP | ग्रीन पोर्ट योजना |
| HPC | उच्चाधिकार समिती किंवा शक्ती प्रदान समिती |
| INR | भारतीय रुपया |
| ITZ | आंतरभरती क्षेत्र |
| IWT | अंतर्देशीय जलमार्ग वाहतूक |
| LoI | इरादा पत्र |
| एलएनजी | द्रवीभूत नैसर्गिक वायू |
| एलपीजी | द्रवीभूत पेट्रोलियम वायू |
| MACC | किमान आश्वासित कॅप्टिव्ह कार्गो |
| MERC | महाराष्ट्र वीज नियामक आयोग |

| | |
|---|---|
| MGC | किमान हमी माल |
| एमआयडीसी | महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ |
| MMB | महाराष्ट्र सागरी मंडळ |
| MMDP २०२२ | महाराष्ट्र सागरी विकास धोरण-२०२३ |
| MMTPA | दशलक्ष मेट्रिक टन प्रतिवर्ष |
| एमटी | दशलक्ष टन |
| MoEF | पर्यावरण आणि वन मंत्रालय |
| एनओसी | ना हरकत प्रमाणपत्र |
| पीओएल | पेट्रोलियम, तेल आणि वंगण. |
| पीपीपी | सार्वजनिक-खाजगी भागीदारी |
| रो-रो | रोल ऑन -रोल ऑफ |
| आरओटी | पुनर्वसन, वापरा आणि हस्तांतरित |
| SDG | शाश्वत विकास उद्दिष्टे |
| SEZ | विशेष आर्थिक क्षेत्र |
| SGST | राज्य वस्तू आणि सेवा कर |
| SPV | विशेष हेतू वाहन |
| TAT | टर्न अराऊंड टाईम |
| TEFR | तांत्रिक-आर्थिक सुसाध्यता अहवाल |
| ToR | संदर्भ अटी |
| WFR | वॉटर फ्रंट रॉयल्टी |

## सामग्री सारणी

**भाग - अ**

## १. शीर्षक

या धोरणाला महाराष्ट्र सागरी विकास धोरण, २०२३ (" **MMDP २०२३** ") म्हटले जाऊ शकते.

## २. प्रस्तावना

### २.१. पार्श्वभूमी

अंदाजे ७२० किलोमीटरपर्यंत पसरलेली महाराष्ट्राची किनारपट्टी भारतातील दुसऱ्या क्रमांकाची सर्वात लांब किनारपट्टी आहे. या किनारपट्टीवर २ अधिसूचित प्रमुख बंदरे आणि ४८ अधिसूचित लहान बंदर हद्दी आहेत. त्यामुळे, राज्याच्या सागरी क्षेत्राचा विकास करण्यास प्रचंड वाव आहे. अशा विकासामुळे लोकांसाठी रोजगाराच्या संधी खुल्या होतील तसेच त्यांना नवीन कौशल्ये विकसित करण्यास मदत होईल. हे उत्पादन क्षेत्राच्या वाढीस देखील मदत करेल आणि महाराष्ट्राचा स्पर्धात्मक फायदा वाढवेल.

महाराष्ट्राचे अंदाजे रुपये २७,११,६८५ कोटींचे सकल राज्य देशांतर्गत उत्पादन सर्वाधिक आहे. राज्याच्या अर्थव्यवस्थेत लहान बंदरांचा (Non-Major Ports) मोठा वाटा आहे. गेल्या वर्षभरात, महाराष्ट्रातील लहान बंदरांनी ५२ दशलक्ष टनांपेक्षा जास्त मालवाहतूक आणि १९ दशलक्षपेक्षा जास्त प्रवाशांची वाहतूक केली. महाराष्ट्रात सध्या ४ कार्यरत ग्रीनफिल्ड बंदरे आहेत.

महाराष्ट्रातील लहान बंदरांच्या विकासाची आणि व्यवस्थापनाची जबाबदारी राज्य सरकारची आहे. गेल्या दोन दशकांपासून सागरी क्षेत्राला चालना देण्यासाठी आणि नियमन करण्यासाठी सागरी विकासासाठी धोरणे जारी केली आहेत. असे पहिले धोरण सन १९९६ मध्ये आणले गेले. या संदर्भातील सर्वात अलीकडील धोरण म्हणजे महाराष्ट्र सागरी विकास धोरण, २०१६, ज्यात २०१९ मध्ये शेवटची सुधारणा करण्यात आली.

या धोरणांतर्गत, महाराष्ट्र सागरी मंडळाने (" **मसामं / MMB**") लहान बंदरांच्या विकासासाठी आणि व्यवस्थापनासाठी अनेक सवलत करार आणि भाडेपट्टा करार स्वाक्षांकित केले आहेत. यापैकी काही सवलत करार

त्यांच्या कार्यचालनाच्या १५ व्या वर्षाच्या जवळ आहेत, त्यानंतर त्यांच्या अटी, विशेषत: वॉटर-फ्रंट रॉयल्टी पेमेंटची मुदत निश्चित करणे आवश्यक आहे. त्यामुळे, बाबनिहाय चर्चा करण्याऐवजी, शासनाच्या मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने (“HPC”) **राज्य मंत्रिमंडळासमोर एक नवीन धोरण प्रस्तावित करण्याचा निर्णय घेतला आहे जे या समस्येचे समाधानकारक आणि सर्वसमावेशकपणे निराकरण करेल.** राज्य मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार, शासन आता MMDP २०२३ सादर करत आहे.

## ३. MMDP-२०२३ ची वैधता आणि अंमलबजावणी

MMDP-२०२३ त्याच्या अधिसूचनेच्या तारखेपासून लागू होईल आणि नवीन किंवा सुधारित धोरण अधिसूचित होईपर्यंत ते अंमलात असेल. MMDP-२०२३ मधील कोणत्याही कलमामध्ये उच्चाधिकार समिती किंवा राज्य मंत्रिमंडळाच्या मान्यतेने सुधारणा करण्यात यावी.

MMDP-२०२३ अधिसूचित झाल्यानंतर, महाराष्ट्र सागरी मंडळ हे राज्य सरकारच्या पूर्व परवानगीने, MMDP- २०२३ अंतर्गत नमूद केलेल्या योजना आणि प्रोत्साहनांची प्रभावी अंमलबजावणी सुनिश्चित करण्यासाठी तपशीलवार मार्गदर्शक तत्त्वे जारी करेल.

शासन गृह विभाग निर्णय क्र. धोरण-०५१८/प्र.क्र.१९/बंदरे-१, दि. १९ जुलै २०१९ अन्वये सुधारित करण्यात आलेले महाराष्ट्र सागरी विकास धोरण-२०१६ हे धोरण महाराष्ट्र सागरी विकास धोरण-२०२३ अधिसूचित होईपर्यंत अंमलात राहील.

## ४. व्याख्या

MMDP-२०२३ मध्ये, संदर्भानुसार आवश्यक नसल्यास, खालील अटींचा अर्थ त्यांना खाली दिल्याप्रमाणे असेल:

४.१. "अतिरिक्त कार्गो" म्हणजे डीपीआरमध्ये नमूद केलेल्या कार्गो वाहतूक अंदाजांपेक्षा अधिक हाताळलेला माल.

४.२. "कॅप्टिव्ह जेट्टी" म्हणजे बंदरावर आधारित उद्योगाने त्यांचे उद्योगासाठी लागणारा कच्चा माल किंवा तयार उत्पादने हाताळण्यासाठी बांधलेली जेट्टी.

४.३. "कोस्टल बर्थ" म्हणजे बंदर किंवा बंदरातील एक नियुक्त स्थान ज्याचा वापर जहाजांच्या मुरींगसाठी केला जातो आणि नॉन-एक्झिम कार्गो किंवा जहाजांमधून प्रवाशांची उतार करण्यासाठी केला जातो- चढ -

४.४. "कोस्टल शिपिंग" म्हणजे भारतीय बंदरांदरम्यान जहाजांद्वारे मालवाहतूक.

४.५. "सवलत करार" म्हणजे महाराष्ट्र सागरी मंडळ किंवा राज्य सरकार आणि एखादी संस्था किंवा व्यक्ती यांच्यामध्ये विद्यमान प्रकल्प, बंदर प्रकल्प, शिपयार्ड, मरीना प्रकल्प, जहाज पुनर्वापर सुविधा इत्यादी बांधण्यासाठी किंवा चालवण्यासाठी स्वाक्षांकित करण्यात आला आहे असा करार, ज्यामध्ये संबंधित प्रकल्पासाठी अटी आणि शर्तींचा तपशील समाविष्ट आहे.

४.६. "सवलत करारनामाधारक " म्हणजे एखादी संस्था किंवा व्यक्ती, ज्यामध्ये खाजगी संस्था समाविष्ट आहे, ज्याने सवलत करारनामा स्वाक्षांकित केला आहे.

४.७. "पूर्वीची धोरणे" म्हणजे महाराष्ट्र शासनाने (परिवहन आणि बंदरे) आजपर्यंत जारी केलेली सागरी विकास धोरणे आणि त्यांच्या संबंधित सुधारणा.

४.८. "विद्यमान प्रकल्प" म्हणजे कोणत्याही आत येणा-या व बाहेर जाणा-या मालाची हाताळणी करण्यासाठी वॉटरफ्रन्ट आणि लगतच्या जमिनीच्या वापरासाठी बंदर हद्दीत स्थित असलेला कोणताही विद्यमान प्रकल्प, ज्यामध्ये उतरणावळ, चढणावळ, मालाची ट्रान्स-शिपिंग किंवा प्रवासी जलवाहतूक इत्यादीचा समावेश आहे. विद्यमान प्रकल्पांमध्ये विद्यमान हरीतक्षेत्र (ग्रीनफील्ड) बंदरे, बहुउद्देशीय जेटी, कॅप्टिव्ह जेटी आणि पूर्वीच्या धोरणांतर्गत परिभाषित केलेल्या अशा इतर जेटींचा समावेश असेल.

४.९. फ्लोटिंग कॉटेज म्हणजे नद्या, तलाव, खाड्या, बंदरे, धरणे, किनारी पाणी इत्यादी जलसाठ्यांच्या काठी नांगरलेल्या स्वयंनिहित तरंगत्या रचना आहेत ज्यांना कोणत्याही प्रकारचे पेय किंवा खाण्यायोग्य पदार्थांसह किंवा त्याशिवाय राहण्यासाठी प्रदान केले जाते.

४.१०. "उच्चाधिकार समिती" किंवा "शक्ती प्रदान समिती (HPC)" म्हणजे राज्य सरकारने वेळोवेळी सुधारित केलेली अशी समिती.

४.११. " Hinterland " म्हणजे बंदराच्या मागे किंवा त्या परिसरात असलेल्या औद्योगिक क्षेत्राचा भाग आणि ज्या भौगोलिक प्रदेशावर बंदराचा मोठा प्रभाव आहे.

४.१२. "अंतर्देशीय जल वाहतूक" किंवा "IWT" म्हणजे अंतर्देशीय जलमार्गावरील माल आणि प्रवाशांची वाहतूक.

४.१३. अंतर्देशीय नौवहनाच्या उद्देशाने "अंतर्देशीय जल", ज्यामध्ये कोणत्याही-

(i) कालवे, नदी, तलाव किंवा बेसलाईनच्या आतील भाागात असलेला नौकानयनास सुयोग्य असा जलमार्ग किंवा केंद्र सरकारच्या अधिकृत राजपत्रात अधिसूचनेद्वारे घोषित केले जाते;

(ii), केंद्र सरकारने अधिकृत राजपत्रात अधिसूचनेद्वारे घोषित केली असेल अशी भरतीच्या पाण्याची मर्यादा;

(iii) केंद्र सरकारने घोषित केलेले राष्ट्रीय जलमार्ग;

(iv) केंद्र सरकारद्वारे अधिकृत राजपत्रात अधिसूचनेद्वारे घोषित केले जाईल असे इतर जलमार्ग; आणि

(v) राज्य सरकारद्वारे अधिकृत राजपत्रात अधिसूचनेद्वारे घोषित केले जाणारे इतर जलमार्ग.

४.१४."आंतरभरती जमीन (भरती-ओहोटीच्या प्रभावाखालील जमीन)" ही किना-यावरील अशी जमीन आहे, जी भरतीच्या वेळी पाण्याखाली असते आणि ओहोटीच्या वेळी उघडी पडते.

४.१५. "जेट्टी" म्हणजे समुद्रातील एक कृत्रिम रचना ज्याव्दारे प्रवासी आणि मालाची जहाजातून उतार करणे-चढ शक्य होते.

४.१६. " भाडेपट्टाधारक " म्हणजे खाजगी घटकासह, एखादी संस्था किंवा व्यक्ती, ज्याने महाराष्ट्र सागरी मंडळाशी भाडेपट्टा करार केला आहे .

४.१७. " मेरीटाइम क्लस्टर" म्हणजे भौगोलिकदृष्ट्या एकमेकांच्या जवळ असलेल्या आणि त्यांच्या क्रियाकलापांमध्ये समन्वय असलेल्या सागरी क्षेत्रातील कंपन्या, संस्था, व्यवसाय आणि इतर उद्योगातील घटकांचा समूह.

४.१८. " गौण खनिजे " मध्ये सागरी पायाभूत सुविधांच्या विकासादरम्यान उत्खनन केलेल्या माती, चिकणमाती, वाळू इत्यादी खनिजांचा समावेश होतो.

४.१९. "महाराष्ट्र सागरी मंडळाची जेट्टी" म्हणजे अशी जेट्टी जी महाराष्ट्र सागरी मंडळाच्या मालकीची असते आणि / किंवा मंडळाव्दारे परिचलित करण्यात येते.

४.२०. "MMDP- २०२३" म्हणजे हे धोरण, ज्यामध्ये राज्य सरकार वेळोवेळी सुधारणा करू शकते.

४.२१. "बहुउद्देशीय जेट्टी" म्हणजे विद्यमान प्रकल्पाची जेट्टी जी खाजगी गुंतवणूक करुन खाजगी पक्षाने बांधलेली किंवा नूतनीकरण केलेली किंवा आधुनिकीकरण केलेली आहे किंवा महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे त्रयस्थ पक्षाचा माल हाताळण्यासाठी खाजगी घटकाला भाड्याने दिली आहे.

४.२२. "ऑपरेटर" मध्ये सवलतधारक किंवा भाडेपट्टाधारक, जशी परिस्थिती असेल त्यानुसार, यांचा समावेश होतो.

४.२३. या धोरणांतर्गत " बंदर " म्हणजे भारतीय बंदरे अधिनयिम, १९०८ (१९०८ चा १५) कलम ४ च्या उप-कलम (१) च्या खंड (अ) अंतर्गत राज्य सरकारने अधिसूचित केलेले असे लहान बंदर. (Non-Major Port)

४.२४. " बंदर कर " म्हणजे भारतीय बंदरे अधिनियम, १९०८ (१९०८ चा १५) किंवा इतर कोणत्याही लागू कायद्यांतर्गत बंदराच्या सर्व किंवा कोणत्याही भागाचा वापर करण्यासाठी किंवा त्यामध्ये प्रवेश प्रदान करण्यासाठी देय मोबदला.

४.२५. "बंदर प्रकल्प" म्हणजे MMDP-२०२३ अधिसूचित झाल्यानंतर चढणावळ, उतरणावळ, मालाची ट्रान्स-शिपिंग यासह कोणत्याही आत येणा-या किंवा बाहेर जाणा-या मालाच्या हाताळणी करण्यासाठी किंवा प्रवासी

वाहतूक करण्यासाठी वॉटर-फ्रंट, अधिकारक्षेत्रातील पाणी आणि लगतच्या जमिनीच्या वापरासाठी बंदर हद्दीत असलेला कोणताही नवीन प्रकल्प.

४.२६. " रो-रो सेवा" म्हणजे जहाजातून माल किंवा प्रवाशांची रॅम्प व्दारे चढ-उतार करणे..

४.२७. "दरांची अनुसूची(Schedule of Rates)" म्हणजे विविध देय, कर , शुल्क, फी आणि वॉटरफ्रन्ट रॉयल्टीसह रॉयल्टी इत्यादी आणि राज्य सरकारने वेळोवेळी अधिसूचित केल्यानुसार ते कोणत्या दराने आकारले जातात याचा तपशील देणारी अनुसूची.

४.२८. "जहाज पुनर्वापर" म्हणजे धोकादायक आणि इतर सामग्रीची काळजी घेत, पुनर्प्रक्रिया आणि पुनर्वापरासाठी घटक आणि सामग्री पुनर्प्राप्त करण्यासाठी जहाजाच्या पुनर्वापराच्या सुविधेवर जहाज तोडण्याची क्रिया आणि त्यात साठवणूक तसेच घटक व सामग्रीवर त्याठिकाणी प्रक्रिया करणे यासारख्या संबंधित ऑपरेशन्सचा समावेश होतो, परंतु त्यांची पुढील प्रक्रिया किंवा विल्हेवाट स्वतंत्र सुविधांमध्ये नाही.

४.२९."जहाज पुनर्वापर सुविधा" म्हणजे असे परिभाषित क्षेत्र जे जहाज पुनर्वापरासाठी वापरलेले ठिकाण, यार्ड किंवा सुविधा आहे.

४.३०. "शिपयार्ड्स" म्हणजे समुद्रकिनाऱ्यावरील जहाज बांधणी किंवा जहाज दुरुस्तीसाठी नियुक्त केलेले क्षेत्र.

४.३१. " राज्य औद्योगिक धोरण" म्हणजे राज्य सरकारने वेळोवेळी अधिसूचित केलेले औद्योगिक धोरण.

४.३२. " वॉटर-फ्रंट " म्हणजे बंदराचा भाग असलेल्या पाण्यालगतचा समुद्रकिनारा.

४.३३. "वॉटर-फ्रंट रॉयल्टी" किंवा "WFR" म्हणजे दराची अनुसूची किंवा सवलत करार किंवा भाडेपट्टा करार यौकी जे लागू असेल त्यामध्ये निर्दिष्ट केल्यानुसार माल, कंटेनर, कार इत्यादी हाताळण्यासाठी आकारण्यात आलेली रॉयल्टी. ह्या धोरणांतर्गत WFR चा कोणताही संदर्भ म्हणजे MMDP २०२३ च्या अधिसूचनेपूर्वी लागू असलेले मासिक शुल्क, चढणावळ आणि उतरणावळ शुल्क आणि व्हार्फेज शुल्क असा अर्थ होईल.

## ५. MMDP-२०२३ ची व्याप्ती

MMDP- २०२३ हे धोरण सागरी क्षेत्राचा सर्वांगीण विकास व्हावा यासाठी त्याच्या सर्व उप-क्षेत्रांसाठी पुरेशा तरतुदी प्रदान करते. नवीन धोरणाची व्याप्ती खाली दिलेली आहे:

- बंदर प्रकल्प
- विद्यमान प्रकल्प
- कॅप्टिव्ह जेटी
- जोडणी पायाभूत सुविधा
- कोस्टल शिपिंग , अंतर्देशीय जलमार्ग
- ऑफ-शोअर/कोस्टल मनोरंजन आणि क्रूझ पर्यटन
- शिपयार्ड
- मरिना प्रकल्प
- जहाज पुनर्वापर सुविधा
- सागरी प्रकल्पांसाठी जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप
- मुदतवाढीच्या वेळी मूल्यांकन आणि वाटप
- मालमत्ता मुद्रीकरण
- पाइपलाइन शुल्क/ वे लीव्ह शुल्क /इतर शुल्क /ड्राफ्ट प्रीमियम शुल्क
- बंदरावर आधारित औद्योगिक विकास
- कौशल्य विकास
- शाश्वत सागरी विकास
- मच्छीमारांना नुकसान भरपाई
- सागरी विकासासाठी प्रोत्साहने

MMDP- २०२३ अंतर्गत प्रकरणांमध्ये खालील विषयांचा समावेश आहे:

| प्रकरण | वर्णन |
|---|---|
| बंदर प्रकल्प | बंदर प्रकल्पांच्या विकासासाठी आणि सुलभीकरणासाठी सुविधा देते. |
| विद्यमान प्रकल्प | विद्यमान प्रकल्पांसाठी मुदतवाढ, WFR पुनर्निर्धारित (रिसेट) करणे आणि विस्तारासाठी लाभ प्रदान करते. |
| कॅप्टिव्ह जेटी | कॅप्टिव्ह जेट्टींचा विकास आणि त्यांचा सवलतीचा कालावधी यासाठी तरतूद करते. |
| जोडणी पायाभूत सुविधा | प्रकल्पांसाठी रस्ते, रेल्वे आणि अंतर्देशीय जलमार्ग जोडणी सुधारण्यासाठी तरतूद करते. |
| कोस्टल शिपिंग आणि अंतर्देशीय जलमार्ग | कोस्टल शिपिंग आणि अंतर्देशीय जलमार्ग यांच्या विकासासाठी तरतूद करते. |
| ऑफ-शोअर/कोस्टल मनोरंजन | क्रूझ पर्यटन, फ्लोटेल्स, मासेमारी जहाजे, हाऊसबोट, उभयचर बस इत्यादींसाठी प्रोत्साहने देते. |
| शिपयार्ड | शिपयार्डचा विकास आणि सुलभीकरण यासाठी सुविधा पुरवते. |
| मरिना प्रकल्प | मरिना प्रकल्पांचा विकास आणि सुलभीकरण यासाठी सुविधा पुरवते. |
| जहाज पुनर्वापर सुविधा | जहाज पुनर्वापर सुविधांचा विकास आणि सुलभीकरण यासाठी सुविधा पुरविते. |
| सागरी प्रकल्पांसाठी जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप | विद्यमान सरकारी जमीन आणि आंतरभरती जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप करण्याची तरतूद करते. |
| मुदतवाढीच्या वेळी मूल्यांकन आणि वाटप | सागरी प्रकल्पांच्या मुदतवाढीच्या वेळी स्थावर मालमत्तेचे मूल्यांकन आणि वाटप यासाठी तरतूद करते. |

| प्रकरण | वर्णन |
| --- | --- |
| मालमत्ता मुद्रीकरण | महाराष्ट्र सागरी मंडळाच्या न वापरलेल्या आणि कमी वापरलेल्या जमिनी आणि मालमत्तेची ओळख आणि त्यांचे मुद्रीकरण यासाठी तरतूदी करते. |
| पाइपलाइन शुल्क/ वे लीव्ह शुल्क / इतर शुल्क /ड्राफ्ट प्रीमियम शुल्क | पाइपलाइन, वे लीव्ह, ऑप्टीकल फायबर केबल आणि महाराष्ट्र सागरी मंडळाच्या अधिकारक्षेत्रातील जमीन / पाण्याचा वापर यासाठी शुल्क (ड्राफ्ट प्रीमियम शुल्क) आकारण्यासाठी आधार आणि पद्धत यासाठी तरतूदी करते. |
| बंदरावर आधारित औद्योगिक विकास | किनारी क्षेत्र आणि सागरी क्लस्टर्सच्या सर्वांगीण विकासासाठी तरतूद करते. |
| कौशल्य विकास | कौशल्य विकासाद्वारे सुरक्षित आणि शाश्वत बंदरांच्या विकासास प्रोत्साहन देते आणि महाराष्ट्रात सागरी विद्यापीठाची स्थापना करण्याची तरतूद करते. |
| शाश्वत सागरी विकास | केंद्र शासनाने जारी केलेल्या हरीत सागर- ग्रीन पोर्ट मार्गदर्शक तत्त्वे किंवा इतर मार्गदर्शक तत्त्वांचे अनुपालन करण्यासाठी ऑपरेटरला प्रोत्साहन देते. |
| मच्छीमारांना नुकसान भरपाई | राज्य शासनाच्या लागू असलेल्या धोरणानुसार मच्छिमारांना भरपाईची तरतूद करते. |
| सागरी विकासासाठी प्रोत्साहने | सागरी प्रकल्प, क्रूझ पर्यटन आणि कोस्टल शिपींग यांना आर्थिक प्रोत्साहनांद्वारे सुविधा पुरवते. |

**भाग - ब**

## ६. बंदर प्रकल्प

बंदरांच्या विकासामुळे औद्योगिक क्रियाकलापांना चालना मिळते. त्यामुळे त्यांच्यासाठी खासगी क्षेत्रातील गुंतवणूक आकर्षित करणे अत्यावश्यक आहे. बंदर प्रकल्पांची ओळख, संकल्पना आणि वाटप या धोरणात नमूद केलेल्या पध्दतीनुसार केले जाईल.

बंदर प्रकल्पांसाठीचे सवलत करार राज्य सरकारच्या मॉडेल सवलत करारानुसार असतील. या मॉडेल सवलत करारातील कोणत्याही विचलनासाठी राज्य सरकारची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. बंदर प्रकल्पाच्या कार्यचालनासाठी तसेच सवलतर करारनामाधारकास बंदर प्रकल्पातून बाहेर पडण्यासाठी सवलत करारामध्ये तपशीलवार अटी आणि शर्ती नमूद करण्यात येतील.

### ६.१. बंदर प्रकल्पांच्या श्रेणी

(a) कॅप्टिव्ह जेटी व्यतिरिक्त, बंदर प्रकल्प हे खालील श्रेणींमध्ये वर्गीकृत केले जातील:

| अ.क्र. | बंदर प्रकल्पाची श्रेणी | किमान स्थिर भांडवली गुंतवणूक (INR कोटी) | किमान माल हाताळणी क्षमता (MMTPA मध्ये) |
|---|---|---|---|
| १. | मायक्रो पोर्ट (Micro Port) | १० | १ |
| २. | लहान बंदर (Small Port) | ५० | १० |
| ३. | मध्यम बंदर (Medium Port) | २५० | २५ |
| ४. | मोठे बंदर (Large Port) | ७५० | ५० |
| 5. | मेगा पोर्ट (Mega Port) | ३००० | १०० |

(b) याव्यतिरिक्त, एकदा कार्यान्वित झाल्यानंतर, मोठ्या आणि मेगा बंदरांना ३ वर्षांच्या कालावधीत खालील उत्पादकता मापदंडांचे पालन करणे देखील आवश्यक आहे:

| S. क्र | विशेष | पात्रता घटक |
|---|---|---|
| १. | कंटेनर जहाजासाठी सरासरी TAT (कमाल) | ३६ तास |
| २. | कोरड्या मालवाहू जहाजांसाठी सरासरी TAT (कमाल) | ८४ तास |
| ३. | सरासरी जहाज प्रतीक्षा वेळ (कमाल) | ८ तास |
| ४. | बर्थवर उपलब्ध सरासरी खोली (किमान) | १४ मीटर |
| ५. | कंटेनर क्रेन हालचाली (किमान) | २० चाली/तास |
| ६. | घनरुप कार्गो हाताळणी उत्पादकता (किमान) | ३०० MT/तास |
| ७. | द्रवरुप कार्गो डिस्चार्ज दर (किमान) | ३०० MT/तास |

(c) हे स्पष्ट केले जाते की कलम ६.१(a) आणि ६.१(b) मध्ये नमूद केलेले निकष कॅप्टिव्ह जेटी वगळता फक्त माल हाताळणाऱ्या बंदर प्रकल्पांना लागू होतील. प्रवासी वाहतूक हाताळणारे बंदर प्रकल्प राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे जारी केलेल्या तपशीलवार मार्गदर्शक तत्त्वांनुसार नियंत्रित केले जातील. कॅप्टिव्ह जेटी या धोरणाच्या प्रकरण-८ अंतर्गत करण्यात आलेल्या तरतूदींद्वारे नियंत्रित केल्या जातील.

(d) वर नमूद केल्याप्रमाणे बंदर प्रकल्पांचे वर्गीकरण किमान स्थिर भांडवली गुंतवणूक (Minimum Fixed Capital Investment) वर आधारित असेल.

(e) महाराष्ट्र सागरी मंडळ हे उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने बंदर प्रकल्पांच्या विविध श्रेणींसाठी अतिरिक्त टप्पे तयार करेल. प्रत्येक बंदर प्रकल्पाला अशा टप्प्यांचे पालन करावे लागेल.

### ६.२. सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी:

खालील तक्त्यामध्ये सूचीबद्ध केलेल्या मॉडेलचा वापर करून ऑपरेटरद्वारे बंदर प्रकल्प विकसित केले जाऊ शकतात. यात स्पष्टता येण्याच्या उद्देशाने, इतर प्रकारचे सागरी प्रकल्प विकसित करण्याचे मॉडेल त्यांच्या सवलती/भाडेपट्टा कालावधीसह खाली देण्यात आले आहेत.

सार्वजनिक खाजगी भागिदारी (PPP) मॉडेल्स म्हणजे डिझाईन, बांधा, मालकी, वापरा आणि हस्तांतरित करा

(“DBOOT ”); पुनर्वसन करा, वापरा आणि हस्तांतरित करा (“ ROT”) तसेच, बांधा, वापरा, हस्तांतरित करा (“BOT”), इतरांसह.

| प्रकल्पाचा प्रकार | विकासकाची जबाबदारी | लागू | सवलत/ भाडेपट्टा कालावधी | मुदतवाढीचा कालावधी |
|---|---|---|---|---|
| मायक्रो बंदर आणि लहान बंदर | नवीन बंदर प्रकल्प विकास | नवीन बंदर प्रकल्प आणि जेट्टी विकासासाठी सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षांपर्यंत | २० वर्षांपर्यंत |
| मध्यम बंदर आणि मोठे बंदर | नवीन बंदर प्रकल्प विकास | नवीन बंदर प्रकल्प आणि जेट्टी विकासासाठी सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ५० वर्षांपर्यंत | २० वर्षांपर्यंत |
| मेगा पोर्ट | नवीन बंदर प्रकल्प विकास | नवीन बंदर प्रकल्प आणि जेट्टी विकासासाठी सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ७० वर्षांपर्यंत | २० वर्षांपर्यंत |
| MMB जेट्टी | MMB जेट्टीचे पुनर्वसन आणि कार्यचालन | नवीन जेट्टी विकासासाठी सवलत/भाडेपट्टा मॉडेल | १५ वर्षांपर्यंत | १५ वर्षांपर्यंत |
| कॅप्टिव्ह जेटी | नवीन कॅप्टिव्ह जेट्टी विकास | जेट्टी विकासासाठी सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षांपर्यंत किंवा उद्योग अस्तित्वात असेपर्यंत | ३० वर्षांपर्यंत (फक्त विद्यमान कॅप्टिव्ह जेटींसाठी) |
| शिपयार्ड | सुविधेची डिझाईन करा, बांधा आणि वापरा | सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षांपर्यंत | २० वर्षांपर्यंत |

| प्रकल्पाचा प्रकार | विकासकाची जबाबदारी | लागू | सवलत/ भाडेपट्टा कालावधी | मुदतवाढीचा कालावधी |
|---|---|---|---|---|
| जहाज पुनर्वापर | सुविधेची डिझाईन करा, बांधा आणि वापरा | सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षे | ३० वर्षे |
| मरिना प्रकल्प | सुविधेची डिझाईन करा, बांधा आणि वापरा | सवलत/भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षे | २० वर्षे |
| फ्लोटेल, हाउसबोट आणि सीप्लेन | स्वतःच्या जोखमीवर कार्यचालन आणि देखरेख करा | भाडेपट्टा मॉडेल | ३० वर्षांपर्यंत | ५ वर्षांपर्यंत |

**६.३. मुदतवाढीचे धोरण**

(a) सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी, यथास्थिती लागू असेल तो, संपण्यापूर्वी एक वर्ष आधी ऑपरेटर सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधीस मुदतवाढ मिळण्याची मागणी करु शकतो. बंदर प्रकल्पाच्या ऑपरेटरने त्याच्या डीपीआर मध्ये नमूद केलेल्या माल वाहतूक अंदाजाच्या ५०% मालवाहतूक करणे, १००% गुंतवणूक करणे, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनची पूर्तता करणे या अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून, बंदर प्रकल्पांसाठी सवलत कालावधी किंवा भाडेपट्टीचा कालावधी वरील कलम ६.२ मध्ये तक्त्यात प्रदान केलेल्या कालावधीसाठी वाढविला जाऊ शकतो. ही मुदतवाढ राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येईल.

(b) डीपीआर मध्ये नमूद केलेला माल वाहतूकीचा अंदाज, गुंतवणूक, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन याबाबत बंदर प्रकल्पाची प्रगती दर्शविणारा त्रैमासिक अहवाल ऑपरेटर महाराष्ट्र सागरी मंडळाला सादर करेल. प्रत्येक बंदर प्रकल्प त्याच्या डीपीआरचे पालन करत आहे किंवा कसे, याचे मूल्यमापन करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ दरवर्षी प्रत्येक बंदर प्रकल्पाचा आढावा घेईल.

(c) कलम ६.२ मधील तक्त्यामध्ये निर्दिष्ट केलेल्या कालावधीच्या पलीकडे द्यावयाची कोणतीही मुदतवाढ ही

फक्त उच्चाधिकार समिती (HPC) च्या परवानगीने देण्यात यावी. कोणतीही अनुज्ञेय मुदतवाढ समाविष्ट करुन मंजूर करण्यात आलेला सवलत कालावधी किंवा लीज कालावधी संपल्यानंतर, बंदर प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळ/राज्य सरकार कडे हस्तांतरित केला जाईल. महाराष्ट्र सागरी मंडळ/राज्य सरकार बंदर प्रकल्प चालवेल आणि पारदर्शक व स्पर्धात्मक बोली प्रक्रियेद्वारे अशा बंदर प्रकल्पांच्या टर्मिनलचे वाटप करेल.

### ६.४. वॉटर फ्रन्ट रॉयल्टी

बंदर प्रकल्पांकरिता वॉटर-फ्रंट रॉयल्टी (" **WFR** ") आणि त्याची वाढ ही त्यांच्या सवलतीच्या करारानुसार किंवा भाडेपट्टी करारानुसार, जे लागू असेल त्याप्रमाणे, लागू होईल.

### ६.५. विस्तारासाठी WFR पुनर्निर्धारित (रीसेट) करणे

(a) जर बंदर प्रकल्पांचे ऑपरेटर प्रारंभिक डीपीआरमध्ये नमूद केल्याप्रमाणे माल वाहतूक अंदाज, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन पूर्ण करतील आणि नंतर डीपीआर मधील कामाचा प्रारंभिक वाव पूर्ण करण्यासाठी आवश्यक असलेल्या FCI च्या किमान २५% गुंतवणूक करून त्यांच्या सुविधेचा विस्तार करतील, तर विस्तारित सुविधेसाठीचा **WFR** हा ज्या वर्षी विस्तारित सुविधेने अतिरिक्त माल हाताळण्यास सुरुवात केली त्या वर्षी रीसेट केले जाईल. असा पुनर्निर्धारित केलेला **WFR** हा बंदर प्रकल्पाच्या विस्तारामुळे निर्माण होणाऱ्या फक्त अतिरिक्त मालहाताळणीसाठी लागू होईल.

(b) बंदर प्रकल्पाच्या सवलत करार किंवा भाडेपट्टा करारामध्ये पहिल्या वर्षासाठी निर्दिष्ट केलेल्या WFR च्या समतुल्य रकमेवर WFR रीसेट केला जाईल. अतिरिक्त मालवाहतूकीसाठी हे रीसेट केलेले WFR पहिल्या १५ वर्षांसाठी प्रत्येक वर्षी २०% ने वाढवले जाईल. त्यानंतर, १६ व्या वर्षापासून पुढे WFR प्रत्येक ५ व्या आर्थिक वर्षी ३% ने वाढवले जाईल.

(c) सवलतीच्या कालावधीत किंवा भाडेपट्टा कालावधी दरम्यान हाती घेतलेल्या बंदर प्रकल्पाच्या केवळ दोन (२) विस्तारांसाठी WFR चे रीसेट करण्याची परवानगी असेल .

### ६.६. बंदराचे कामकाज

ऑपरेटरला पूर्ण-सेवा प्रकल्प म्हणून बंदर प्रकल्प चालवण्याची किंवा सवलत करार / भाडेपट्टा करारांतर्गत त्याच्या जबाबदाऱ्या अंमलात आणण्यासाठी, सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी दरम्यान उप-सवलत/उप-

भाडेपट्टा करार करण्याची परवानगी दिली जाईल. तथापि, उप-सवलत करारनामाधारकांव्दारे/उप-भाडेपट्टेदारांद्वारे केलेली कोणतीही कृत्ये, वगळणे, निष्काळजीपणा, चूक किंवा उल्लंघनासाठी ऑपरेटर हे पूर्णपणे जबाबदार राहतील, जणू काही असे उल्लंघन, कृती, वगळणे, निष्काळजीपणा किंवा चूक ही ऑपरेटर किंवा त्याच्या एजंट किंवा कामगार द्वारे झाली असेल, असे समजण्यात येईल. सवलतीच्या कालावधीत किंवा भाडेपट्टीच्या कालावधीत, जसे की परिस्थिती असेल त्याप्रमाणे, उप-सवलत/उप-भाडेपट्टा करार करण्यासाठी ऑपरेटरला राज्य सरकारची परवानगी आवश्यक असेल.

### ६.७. संकीर्ण

(a) बंदरे, नौवहन आणि जलमार्ग मंत्रालयाने प्रोत्साहन दिलेल्या कोणत्याही मोठ्या बंदरात महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे जास्तीत जास्त इक्विटी सहभाग पेड-अप भांडवलाच्या ७६% पर्यंत असू शकतो. महाराष्ट्र सागरी मंडळाच्या इक्विटी सहभागाचे प्रमाण एकूण प्रकल्प खर्चाच्या प्रमाणात परिगणित केले जाईल.

(b) MMB स्वतःचे सागरी प्रकल्प, जेटी इत्यादी विकसित करू शकते.

(c) MMDP-२०२३ अंतर्गत प्रकल्पांसाठी राज्य शासन / किंवा त्याच्या प्राधिकरणे / संस्था यांच्या मार्फत परवाने आणि ना हरकत प्रमाणपत्रे जारी करण्याकरीता एक खिडकी योजना (Single Window) राबविण्यात येईल. याबाबतची कार्यपध्दती महाराष्ट्र सागरी मंडळाकडून सुनिश्चित करण्यात येईल.

### ६.८. वाटपासाठी कार्यपद्धती

निविदाकाराला बंदर प्रकल्पाचे वाटप खालील पद्धतीने खरेदी प्रक्रियेद्वारे केले जाईल:

(a) जेथे प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे निश्चित केला जाईल, तेथे पारदर्शक निविदा प्रक्रिया अवलंबली जाईल.

(b) जेथे विकासकाद्वारे प्रकल्प निश्चित केला जाईल तेव्हा,

i) प्रकल्प विकसक/प्रवर्तक खाजगी संस्था असल्यास, स्विस चॅलेंज मार्गाचा अवलंब केला जाऊ शकतो.

ii) प्रकल्प विकसक सरकारी संस्था/घटक इत्यादी असल्यास, थेट नामांकन केले जाऊ शकते.

## ७. विद्यमान प्रकल्प

**७.१.** MMDP २०२३ अंतर्गत अन्यथा प्रदान केल्याशिवाय, सवलतीचा कालावधी किंवा भाडेपट्टीचा कालावधी वगळता विद्यमान प्रकल्पांसाठी अटी व शर्ती, यथास्थिती, त्यांच्या सवलत करारानुसार किंवा भाडेपट्टा करारानुसार असतील.

**७.२.** विद्यमान प्रकल्पांसाठी सवलत कालावधी किंवा लीज कालावधी हा कलम ६.२ मध्ये प्रदान केल्याप्रमाणे असेल. विद्यमान प्रकल्पांचा सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी निश्चित करण्याच्या मर्यादित हेतूसाठी, विद्यमान प्रकल्पांचे वर्गीकरण कलम ६.१(a) मध्ये देण्यात आलेल्या तक्त्यानुसार केले जाईल.

### ७.३. विस्तार धोरण

(a) सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी, यथास्थिती लागू असेल तो, संपण्यापूर्वी एक वर्ष आधी ऑपरेटर सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधीस मुदतवाढ मिळण्याची मागणी करु शकतो. बंदर प्रकल्पाच्या ऑपरेटरने त्याच्या डीपीआर मध्ये नमूद केलेल्या माल वाहतूक अंदाजाच्या ५०% मालवाहतूक करणे, १००% गुंतवणूक करणे, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनची पूर्तता करणे या अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून, बंदर प्रकल्पांसाठी सवलत कालावधी किंवा भाडेपट्टीचा कालावधी वरील कलम ६.२ मध्ये तक्त्यात प्रदान केलेल्या कालावधीसाठी वाढविला जाऊ शकतो. ही मुदतवाढ राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येईल. विद्यमान प्रकल्पांच्या सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधीला द्यावयाची मुदतवाढ निश्चित करण्याच्या मर्यादित हेतूसाठी, विद्यमान प्रकल्पांचे वर्गीकरण कलम ६.१(a) मध्ये देण्यात आलेल्या तक्त्यानुसार केले जाईल.

(b) MMDP-२०२३ अधिसूचित झाल्याच्या तारखेपासून, विद्यमान प्रकल्पाचा ऑपरेटर त्याच्या डीपीआर मध्ये नमूद केलेला माल वाहतूकीचा अंदाज, गुंतवणूक, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन याबाबत विद्यमान बंदर प्रकल्पाची प्रगती दर्शविणारा त्रैमासिक अहवाल महाराष्ट्र सागरी मंडळाला सादर करेल. प्रत्येक विद्यमान बंदर प्रकल्प त्याच्या डीपीआरचे पालन करत आहे किंवा कसे, याचे मूल्यमापन करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ दरवर्षी प्रत्येक बंदर प्रकल्पाचा आढावा घेईल.

(c) कलम ७.३ (a) मध्ये निर्दिष्ट केलेल्या कालावधीच्या पलीकडे द्यावयाची कोणतीही मुदतवाढ ही फक्त उच्चाधिकार समिती (HPC) च्या परवानगीने देण्यात यावी. कोणतीही अनुज्ञेय मुदतवाढ समाविष्ट करुन मंजूर करण्यात आलेला सवलत कालावधी किंवा लीज कालावधी संपल्यानंतर, विद्यमान प्रकल्प महाराष्ट्र सागरी

मंडळ/राज्य सरकार कडे हस्तांतरित केला जाईल. महाराष्ट्र सागरी मंडळ/राज्य सरकार विद्यमान प्रकल्प चालवेल आणि पारदर्शक व स्पर्धात्मक बोली प्रक्रियेद्वारे अशा विद्यमान प्रकल्पांच्या टर्मिनलचे वाटप करेल..

### ७.४. वॉटर फ्रंट रॉयल्टी

(a) कॅप्टिव्ह जेटी वगळता, विद्यमान प्रकल्पांसाठी वॉटर-फ्रंट रॉयल्टी आणि त्याची वाढ त्यांच्या सवलत करार किंवा भाडेपट्टा करारानुसार असेल.

(b) जेथे, प्रकल्पाच्या कार्यचालनाच्या १५ व्या वर्षाच्या शेवटी WFR पुनर्निर्धारित करण्याची गरज आहे (सवलत करार किंवा भाडेपट्टा करारामध्ये) आणि त्याबाबत निर्णय आवश्यक आहे, अशा प्रकरणांमध्ये, विद्यमान प्रकल्पांसाठी WFR हा कार्यचालनाच्या १६ व्या वर्षाच्या प्रारंभापासून पुढे प्रत्येक ५व्या आर्थिक वर्षी ३% ने वाढविण्यात येईल.

(c) कलम ७.४(a) आणि ७.४(b) अंतर्गत काहीही प्रदान केले असले तरी, विद्यमान बहुउद्देशीय जेटी, महाराष्ट्र सागरी मंडळाच्या जेटी इत्यादींवर आणि ITZ जमिनीवर हाताळल्या जाणा-या मालवाहतूकीसाठी, WFR हा दरांच्या अनुसूचीनुसार असेल. दरांच्या अनुसूचीमधील WFR हा १ एप्रिलपासून लागू होऊन प्रत्येक ५व्या आर्थिक वर्षी ३% ने वाढविण्यात येईल.

### ७.५. विस्तारासाठी WFR पुनर्निर्धारित (रीसेट) करणे

(a) जर विद्यमान प्रकल्पांचे ऑपरेटर प्रारंभिक डीपीआरमध्ये नमूद केल्याप्रमाणे माल वाहतूक अंदाज, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन पूर्ण करत असतील आणि नंतर डीपीआर मध्ये नमूद कामाचा प्रारंभिक वाव पूर्ण करण्यासाठी आवश्यक असलेल्या स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या किमान २५% गुंतवणूक करून त्यांच्या सुविधेचा विस्तार करतील तर, अशा विस्तारित सुविधेसाठी लागू होणारा WFR हा ज्या वर्षी विस्तारित सुविधेने अतिरिक्त माल हाताळण्यास सुरुवात केली असेल, त्या वर्षी रीसेट केला जाईल. रिसेट केलेला WFR हा विद्यमान प्रकल्पाच्या विस्तारामुळे निर्माण होणाऱ्या फक्त अतिरिक्त मालाकरिता लागू होईल.

(b) विद्यमान प्रकल्पासाठीच्या सवलत करार किंवा भाडपेट्टा करारामध्ये पहिल्या वर्षासाठी निर्दिष्ट केलेल्या WFR च्या समतुल्य रकमेइतका असा WFR रीसेट केला जाईल. अतिरिक्त कार्गोसाठी करण्यात आलेला हा रीसेट WFR पहिल्या १५ वर्षांसाठी प्रत्येक वर्षी २०% ने वाढवला जाईल. त्यानंतर, १६ व्या वर्षाच्या प्रारंभापासून,

पुढे प्रत्येक ५व्या आर्थिक वर्षी ३% ने वाढविण्यात येईल.

(c) सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी दरम्यान हाती घेतलेल्या विद्यमान बंदर प्रकल्पाच्या केवळ २ विस्तारांसाठी WFR चे रीसेट करण्याची परवानगी असेल.

(d) विद्यमान सवलत करारामध्ये काहीही नमूद असले तरी, केवळ "कंटेनर" च्या बाबतीत व्यावसायिक कार्यचालन सुरू होण्याची तारीख ही बंदरावर कंटेनर हाताळण्यासाठी प्रथम सीमाशुल्क अधिसूचना जारी करण्याची तारीख असेल.

### ७.६. बंदराचे कामकाज

ऑपरेटरला विद्यमान प्रकल्प पूर्ण-सेवा प्रकल्प म्हणून चालवण्याची किंवा सवलत करार / भाडेपट्टा करारांतर्गत त्याच्या जबाबदाऱ्या अंमलात आणण्यासाठी, सवलत कालावधीच्या निर्वाहादरम्यान उप-सवलत/उप-भाडेपट्टा करार स्वाक्षांकित करण्याची परवानगी दिली जाईल. तथापि, उप-सवलत करारनामाधारकांव्दारे/उप-भाडेपट्टेदारांद्वारे केलेली कोणतीही कृत्ये, वगळणे, निष्काळजीपणा, चूक किंवा उल्लंघनासाठी ऑपरेटर हे पूर्णपणे जबाबदार राहतील, जणू काही असे उल्लंघन, कृती, वगळणे, निष्काळजीपणा किंवा चूक ही ऑपरेटर किंवा त्याच्या एजंट किंवा कामगार द्वारे झाली असेल, असे समजण्यात येईल. सवलतीच्या कालावधीत किंवा भाडेपट्टयाच्या कालावधीत, यथास्थिती असेल ते, उप-सवलत/उप-भाडेपट्टा करार करण्यासाठी ऑपरेटरला राज्य सरकारची परवानगी आवश्यक असेल.

## ८. कॅप्टिव्ह जेटी

बंदरावर आधारित उद्योगांना आयात-निर्यात (एक्झिम) मालाची मोठ्या प्रमाणात वाहतूक करावी लागते. हे सुलभ करण्यासाठी, महाराष्ट्र सागरी मंडळ अशा उद्योगांना त्यांच्या मालाची वाहतूक सुरळीतपणे करण्यासाठी कॅप्टिव्ह जेटी बांधण्यासाठी परवानगी देते.

**८.१.** महाराष्ट्र सागरी मंडळ, राज्य सरकारच्या मान्यतेने, उद्योगांना कॅप्टिव्ह जेटी विकसित करण्यासाठी नामांकनाव्दारे प्रकल्प प्रदान करेल, जर ते खालील पात्रता निकष पूर्ण करत असतील:

(a) बंदर आधारित उद्योगाचा प्रकल्प हा त्या वेळी लागू असलेल्या महाराष्ट्र औद्योगिक धोरणांतर्गत श्रेणीनुसार मोठा उद्योग किंवा त्याहून अधिक अशा व्याख्येनुसार पात्र असणे आवश्यक आहे.

(b) उद्योगाने आवश्यक त्या सर्व परवानग्या प्राप्त केल्या आहेत.

(c) उद्योग पूर्णपणे कार्यरत असणे आवश्यक आहे.

(d) प्रस्तावित किंवा येऊ घातलेल्या उद्योगांच्या बाबतीत, उद्योगाने आर्थिक आकृतिबंध (फायनान्शियल क्लोजर) प्राप्त करणे आवश्यक आहे.

**८.२.** कलम ८.१(c) आणि ८.१(d) मध्ये काहीही असले तरी, जेथे उद्योगाने आर्थिक आकृतिबंध (फायनान्शियल क्लोजर) प्राप्त केले नसेल परंतु तो उद्योग कलम ८.१(a) आणि ८.१(b) मध्ये नमूद केलेल्या निकषांची पूर्तता करीत असेल तर, अशा उद्योगाला कॅप्टिव्ह जेटी विकसित करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ तात्पुरती परवानगी देऊ शकते.

## ८.३. सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी:

**a)** MMDP-२०२३ अधिसूचित झाल्यानंतर बांधण्यात आलेल्या कॅप्टीव्ह जेट्टींसाठी, उच्चाधिकार समितीने निश्चित केलेला किमान हमी माल (Minimum Guaranteed Cargo) सवलतधारकाने प्राप्त करण्याच्या अटीस अधीन राहून, सवलत कालावधी हा ३० वर्षे किंवा उद्योग असेपर्यंत, यापैकी जे नंतर घडेल तितका असेल.

**b)** विद्यमान कॅप्टिव्ह जेट्टींसाठी सवलतीचा कालावधी किंवा भाडेपट्टीचा कालावधी ३० वर्षांपर्यंत वाढविण्यात येईल आणि अशी मुदतवाढ ही मुदतवाढीच्या प्रत्येक वर्षासाठी करारनामाधारकाने किमान आश्वासित कॅप्टिव्ह कार्गो (" MACC ") चे पालन करणाच्या अधीन असेल.

**c)** किमान आश्वासित कॅप्टिव्ह कार्गो हा सवलत कालावधीच्या शेवटच्या पाच वर्षांमध्ये कॅप्टिव्ह जेट्टी ऑपरेटरद्वारे हाताळलेल्या कार्गोचे वार्षिक सरासरी प्रमाण आहे.

**d)** सवलत कालावधी किंवा भाडेपट्टा कालावधी संपण्याच्या एक वर्ष आधी ऑपरेटरकडून मंजूरी मागितली जाईल.

## ८.४. वॉटरफ्रन्ट रॉयल्टी (WFR)

(a) कॅप्टिव्ह जेट्टींव्दारे हाताळल्या जाणा-या मालासाठी WFR हा दरांच्या अनसूचीनुसार असेल.

(b) दरांची अनुसूची प्रत्येक ५ व्या आर्थिक वर्षी ३% ने वाढवली जाईल आणि ती १ एप्रिल रोजी लागू होईल.

(c) कॅप्टिव्ह जेटींच्या इष्टतम वापराच्या शक्यतेचा शोध घेण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ हे राज्य सरकारच्या मान्यतेने स्वतंत्र मार्गदर्शक तत्त्वे तयार करेल.

## ८.५. संकीर्ण

(a) या धोरणामध्ये काहीही नमूद असले तरी, कॅप्टिव्ह जेटी ह्या प्रकरणातील तरतूदींनुसार नियंत्रित केल्या जातील. MMDP २०२३ अंतर्गत अन्यथा प्रदान केल्याशिवाय, विद्यमान कॅप्टिव्ह जेट्टींसाठीच्या अटी व शर्ती त्यांच्या करारानुसार असतील.

(b) ज्याबाबतीत विद्यमान कॅप्टिव्ह जेट्टीसाठीचा सवलत कालावधी किंवा भाडेपट्टीचा कालावधी हा पूर्वी संपुष्टात आला असेल किंवा MMDP- २०२३ ची अधिसूचना निर्गमित होण्याच्या तारखेपासून सहा (६) महिन्यांच्या कालावधीत संपुष्टात येणार असेल, त्याबाबतीत महाराष्ट्र सागरी मंडळ हे राज्य शासनाच्या मान्यतेने, MMDP- २०२३ च्या अधिसूचनेच्या तारखेपासून ६ महिने किंवा सवलत कालावधी किंवा लीज कालावधी

संपल्याच्या तारखेपासून सहा (६) महिने, यापैकी जे नंतर असेल, त्या कालावधीत मुदतवाढीची किंवा वाटपाची प्रक्रिया पूर्ण करेल.

## ९. जोडणी पायाभूत सुविधा

ह्या प्रकरणामध्ये, विद्यमान प्रकल्प आणि बंदर प्रकल्पांसाठी रस्ते आणि रेल्वे जोडणी तसेच अंतर्देशीय जलमार्गांच्या विकासाद्वारे हिंटरलँडशी जोडणीच्या विकासासाठी महत्त्वाच्या तरतुदी प्रदान करण्यात आल्या आहेत.

### ९.१. रेल्वे जोडणी

**a)** मेगा पोर्ट प्रकल्प वगळता, सर्व बंदर प्रकल्पांना राज्य सरकार हे राज्य / केंद्र सरकारने जारी केलेल्या नवीनतम धोरणांनुसार रेल्वे जोडणी उपलब्ध करुन देईल.

**b)** ग्रीनपोर्ट मेगा पोर्ट प्रकल्पांच्या बाबतीत, रेल्वे जोडणी प्रकल्प हे राज्य/ केंद्र सरकारने जारी केलेल्या धोरणांनुसार विशेष हेतू वाहन (SPV) च्या माध्यमातून राबविण्यात येतील.

### ९.२. रस्ता जोडणी

राज्य शासन हे राज्य / केंद्र सरकारने जारी केलेल्या नवीनतम धोरणांनुसार बंदराच्या हद्दीपासून नजीकच्या राष्ट्रीय महामार्ग/ राज्य महामार्ग पर्यंत रस्ते जोडणी उपलब्ध करुन देईल.

### ९.३. अंतर्देशीय जलवाहतूक जोडणी

अनेक नद्या आणि किनारपट्टीवरील विविध खाड्या, उपसागर आणि सामुद्रधुनी याव्दारे राज्याच्या अंतर्देशीय जलमार्गांद्वारे मालवाहतूक करण्याची अंतर्निहित क्षमता दर्शविते. अशा खाड्या, उपसागर आणि सामुद्रधुनी अंतर्देशीय जलमार्गांद्वारे बंदरांशी जोडणे हे महाराष्ट्रातील बंदरांच्या निर्वासन पायाभूत सुविधांमध्ये सुधारणा करण्यासाठी महत्त्वपूर्ण ठरेल. त्यामुळे, राज्य सरकार अंतर्देशीय जलमार्गांच्या विकासास आणि राज्यातील बंदरांशी त्यांचे एकीकरण करण्यास प्रोत्साहन देईल.

सामाजिक आणि पर्यावरणीय प्रभाव मूल्यांकन तसेच व्यावसायिक आकर्षण, पर्यटन क्षमता, प्रवासी आणि मालवाहतूक सुलभता इत्यादींच्या आधारावर महाराष्ट्र सागरी मंडळ हे अंतर्देशीय जलमार्ग मार्ग निश्चित करेल आणि त्यांचा प्राधान्यक्रम ठरवेल. महाराष्ट्रातील निश्चित केले जाणारे जलमार्ग (नद्या आणि खाड्या) अंतर्देशीय/रिव्हर-सी जलयानांसाठी नौवहनास सुयोग्य केले जातील आणि राज्य सरकार अशा जलमार्गांच्या परिसरात उद्योग उभारण्यास प्रोत्साहन देईल. महाराष्ट्रातील अंतर्देशीय जलमार्ग वाहतुकीच्या (" **IWT** ") विकासासाठी मुख्य धोरणात्मक तरतूदी कलम १०.२ मध्ये प्रदान केल्या आहेत.

याव्यतिरिक्त, गृह विभाग (परिवहन आणि बंदरे), महाराष्ट्र शासन हे उच्चाधिकार समितीच्या मान्यतेने अंतर्देशीय जलमार्गांसाठी धोरण तयार करू शकतात.

## भाग - क

## १०. कोस्टल शिपिंग आणि अंतर्देशीय जलमार्ग

### १०.१. कोस्टल शिपिंग

कोस्टल शिपिंग हे वाहतुकीचे पर्यायी माध्यम आहे जे राज्यातील अपु-या बंदर जोडणीच्या समस्यांचे निराकरण करू शकते. उच्च औद्योगीकरण आणि प्रचंड प्रमाणात कृषी उत्पादनांमुळे कोस्टल शिपिंगचा वापर करून मालवाहतूकीची मोठी क्षमता आहे. शिवाय, महाराष्ट्राला असंख्य खाड्यांसह लांब किनारा असल्यामुळे, कोस्टल शिपींग लोकांसाठी वाहतूकीचे एक प्रभावी माध्यम म्हणून विकसित होऊ शकते.

### (a) मालवाहतूकीसाठी कोस्टल शिपिंग

महाराष्ट्रातील कोस्टल शिपिंगला प्रोत्साहन देण्यासाठी राज्य सरकार पुढील उपाययोजना करेल:

(i) राज्याचे औद्योगिक धोरण किफायतशीर आणि पर्यावरणास अनुकूल वाहतुकीचे साधन म्हणून कोस्टल शिपींगच्या महत्त्व आणि उपयुक्ततेवर भर देईल. कच्चा माल आणि तयार उत्पादनांची वाहतूक करण्यासाठी कोस्टल शिपिंगचा वापर करण्यासाठी ते उद्योगांना प्रोत्साहन देखील देऊ शकते.

(ii) कोस्टल शिपिंगसाठी समर्पित पायाभूत सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी, राज्य सरकार, महाराष्ट्र सागरी मंडळासह, ऑपरेटर्सद्वारे कोस्टल बर्थच्या विकासास परवानगी देईल, जे फक्त नॉन-एक्झिम माल आणि प्रवासी हाताळतील.

(iii) बंदर प्रकल्प आणि विद्यमान प्रकल्पांमध्ये ग्रीन चॅनल सुविधा स्थापन करण्यासाठी राज्य सरकार, महाराष्ट्र सागरी मंडळासह, ऑपरेटर्सना प्रोत्साहित करेल. याला प्रोत्साहन देण्यासाठी, सवलत करार, भाडेपट्टा करार इत्यादींमध्ये पुरेशा तरतूदींचा समावेश केला जाईल.

(iv) राज्य सरकार महाराष्ट्रातील किंवा इतर कोणत्याही भारतीय बंदरातून कोस्टल शिपिंगद्वारे नॉन-कॅप्टिव्ह मालाच्या वाहतूकीसाठी WFR वर ५०% सवलत देईल.

(v) महाराष्ट्रात रो-रो/ रो-पॅक्स जलवाहतूकीसाठी वापरल्या जाणा-या डिझेलवरील (High Flash High Speed Diesel) व्हॅट मधून राज्य सरकार सूट देईल.

**(b) प्रवासी वाहतूकीसाठी कोस्टल शिपिंग**

(i) महाराष्ट्र सागरी मंडळ हे कॅटामरान/ हॉवरक्राप्ट/ रो-रो सेवा/ फेरी सेवा यांची क्षमता असलेल्या जलमार्गाचे आरंभ आणि गंतव्य ठिकाणे निश्चित करेल.

(ii) महाराष्ट्र सागरी मंडळ अशा मार्गांच्या विकासासाठी सक्रियपणे शोध घेईल.

(iii) रो-रो सेवा/फेरी सेवांना राज्यातील वाहतूकीच्या इतर पद्धतींसह एकत्रित करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ उपाययोजना देखील हाती घेईल.

(iv) प्रवासी वाहतूकीसाठी महाराष्ट्र सागरी मंडळ /ऑपरेटरद्वारे पायाभूत सुविधा विकसित केल्या जाऊ शकतात.

**१०.२. अंतर्देशीय जल वाहतूक (IWT)**

IWT हे वाहतूकीचे किफायतशीर आणि पर्यावरणपूरक साधन आहे ज्याचा वापर महाराष्ट्रातील माल आणि प्रवाशांच्या वाहतूकीसाठी केला जाऊ शकतो. IWT प्रकल्पांसाठी नौकानयन मार्ग, फ्लीट आणि टर्मिनल्सच्या पद्धतशीर विकासासाठी गुंतवणूकीची आवश्यकता आहे. IWT मध्ये गुंतवणूकीवर परतावा मिळण्यासाठी गर्भावस्थेचा कालावधी (Gestation Period) मोठा असल्याने प्रारंभिक सरकारी मदत अपरिहार्य आहे. IWT मध्ये असलेल्या मर्यादा आणि त्याच्या वाढीची क्षमता लक्षात घेऊन, राज्य सरकार प्रोत्साहन देईल:

- महाराष्ट्र सागरी मंडळासह, ऑपरेटरद्वारे नौकानयन जलमार्ग आणि टर्मिनल्सच्या विकासासाठी आणि देखभालीसाठी पायाभूत सुविधांची निर्मिती
- महाराष्ट्र सागरी मंडळासह, ऑपरेटर्सद्वारे IWT च्या ताफ्यात वाढ
- IWT क्षेत्रात खाजगी क्षेत्राचा सहभाग
- सुरुवातीच्या टप्प्यात ऑपरेटर, माल पाठवणारे आणि अंतिम वापरकर्त्यांना आर्थिक प्रोत्साहनाची तरतूद
- वाहतुकीच्या इतर पद्धतींऐवजी IWT चा अवलंब करण्याकडे कल वाढविण्यासाठी वापरकर्त्यांमध्ये अधिक जागरूकता

**(a) महाराष्ट्रात अंतर्देशिय जलवाहतूकीचा (IWT) चा विकास**

i) राज्य सरकार माल आणि प्रवाशांच्या वाहतूकीसाठी जलमार्ग म्हणून विकसित करता येईल असे विशिष्ट

मार्ग ओळखेल. यासाठी राज्य सरकारच्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या किनारी अभियंता शाखेची महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामध्ये प्रतिनियुक्ती करण्यात येईल.

ii) विशेषत:, राज्य सरकार माल आणि प्रवाशांच्या वाहतूकीसाठी तसेच इतर सागरी प्रकल्पांसाठी खालील जलमार्ग विकसित करण्याचा प्रयत्न करेल:

- कल्याण-ठाणे-मुंबई जलमार्ग, वसई खाडी आणि उल्हास नदी प्रणाली;
- दाभोळ खाडी - वाशिष्ठी नदी प्रणाली;
- अंबा नदी;
- रेवदंडा खाडी — कुंडलिका नदी प्रणाली; आणि
- पालघर जिल्हा- वसई खाडी आणि वैतरणा खाडी
- ठाणे जिल्हा- उल्हास खाडी आणि पनवेल खाडी
- रायगड जिल्हा- बाणकोट खाडी आणि रेवदंडा खाडी
- रत्नागिरी जिल्हा- जयगड खाडी, भाट्ये खाडी आणि दाभोळ खाडी
- सिंधुदुर्ग जिल्हा- तेरेखोल खाडी, कर्ली खाडी, कालावल खाडी आणि विजयदुर्ग खाडी
- इतर कोणत्याही जलमार्गाला प्राधान्य दिले जाऊ शकते.

iii) ओळखलेल्या मार्गांसाठी खाली सूचीबद्ध केलेल्या क्षेत्रांमध्ये खाजगी क्षेत्राच्या सहभागास राज्य सरकार प्रोत्साहन देईल:

- माल आणि प्रवासी वाहतूकीसाठी जहाजांची मालकी आणि कार्यचालन
- नौकानयन मार्गांचा विकास आणि देखभाल
- यांत्रिकी माल हाताळणी प्रणालीची तरतूद आणि कार्यचालन
- नौकानयन उपकरणांची स्थापना आणि देखभाल
- बंदरवाटाड्या (पायलट) सेवांची तरतूद.

iv) प्रवासी वाहतूक, पर्यटन, आदरातिथ्य, करमणूक, मनोरंजन इत्यादी उद्देशाने मत्स्यव्यवसाय, वन, पोलीस, खारफुटी विभाग इ. यासारख्या इतर विभागांच्या सर्व जेट्टी (मालकीच्या, संचालित, इ.) चा इष्टतम वापर करण्याच्या शक्यतेचा महाराष्ट्र सागरी मंडळ प्रयत्न करेल आणि शोध घेईल.

v) महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे जारी केलेल्या मानक कार्यप्रणालीच्या अधीन राहून, सर्व जेट्टींचा (महाराष्ट्र सागरी मंडळाच्या मालकीच्या किंवा अन्यथा) २४x७ वापर करण्याची परवानगी दिली जाईल.

vi) जल रुग्णवाहिका सेवांसाठी जेट्टी विकसित करण्याकरिता येणारा पायाभूत सुविधा खर्च कमी करण्यासाठी,

महाराष्ट्र सागरी मंडळ जल रुग्णवाहिकांना विद्यमान पायाभूत सुविधा वापरण्याची परवानगी देईल.

**(b) IWT क्षेत्राला सरकारी मदत**

i) महाराष्ट्राच्या अखत्यारीतील अंतर्देशीय जलधीमध्ये अंशदान ठेव कामे करण्यासाठी आणि राज्य सरकारच्या परवानगीनुसार संबंधित प्रकल्प हाती घेण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ मध्ये एक समर्पित सेल तयार केला जाईल.

ii) IWT प्रकल्पांना अर्थसंकल्पीय तरतूद, बहुपक्षीय निधी आणि कर्ज निधीच्या मिश्रणाद्वारे वित्तपुरवठा केला जाईल.

**११. ऑफ-शोर/ कोस्टल मनोरंजन**

**११.१. क्रूझ पर्यटन**

वाढती मागणी आणि खर्च करण्यासाठी उपलब्ध असलेले उत्पन्न यामुळे पुढील दशकात भारतीय क्रूझ बाजारपेठेमध्ये आठ पटीने वाढ होण्याची क्षमता आहे. केंद्रीय स्तरावर, भारत सरकारने क्रूझ प्रवाशांच्या वाढीला चालना देण्यासाठी अनेक उपाययोजना केल्या आहेत. यामध्ये, देशभरातील पाच बंदरांवर (मुंबईसह) ई-व्हिसा सुविधा सुरू करणे; मुक्कामाच्या पहिल्या काही तासांसाठी सर्व मोठ्या बंदरांमध्ये एकसमान एकच दर आकारुन बंदर शुल्कात कपात; इतर गोष्टींबरोबरच देशांतर्गत क्रूझ जहाजांना संमिश्र बंदर शुल्कावर सवलत.

सध्या, गंगा, ब्रह्मपुत्रा, मांडोवी, वेस्ट कोस्ट कॅनॉल आणि ईस्ट कोस्ट कॅनॉल - फक्त ५ राष्ट्रीय जलमार्ग अंतर्देशीय क्रूझ पर्यटन उपलब्ध करुन देत आहेत. या क्षेत्रासमोरील काही आव्हानांमध्ये मर्यादित अंतर्देशीय टर्मिनल्स, नौकानयन मार्गात पुरेशा खोलीचा अभाव आणि खोलीची देखभाल, सुयोग्य जहाजांची मर्यादित उपलब्धता आणि अनेक भागधारकांमुळे मंजूरी मिळवण्यात येणा-या अडचणी यांचा समावेश आहे.

क्रूझ पर्यटनाला चालना देण्यासाठी राज्य सरकार पुढील उपाययोजना करेल:

(a) राज्य पर्यटन विभाग, जिल्हा आणि महानगरपालिका प्राधिकरण तसेच खाजगी क्षेत्राच्या सहभागाने क्रूझ सर्किटवर दीपगृहे आणि इतर पर्यटन आणि वारसा स्थळे विकसित केली जातील.

(b) क्रूझ ऑपरेटरना त्यांच्या क्रूझिंग सर्किट्समध्ये जलक्रीडा, किना-यावरील प्रेक्षणीय स्थळांची मार्गदर्शित टूर

यासारख्या पर्यटन क्रियाकलापांसाठी इतर ऑपरेटर्ससोबत भागीदारी करण्यासाठी सहाय्य प्रदान केले जाईल.

(c) महाराष्ट्रातील सर्व बंदरांवर/जेट्टींवर क्रूझ जहाजांना प्राधान्याने बर्थिंग दिले जाईल.

(d) आंतरराष्ट्रीय प्रवाशांसाठी क्रूझ टर्मिनल्सवर आंतरराष्ट्रीय स्तरावर स्वीकारल्या गेलेल्या नियमांचे पालन करुन इमिग्रेशन प्रक्रिया करण्यात येईल.

(e) महाराष्ट्रातील बंदरांना भेट देणाऱ्या सर्व क्रूझ लाइनर्सना देय असलेल्या बंदर करात २५% सवलत दिली जाईल.

(f) क्रूझ लाइन ग्राहकांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

(g) हे स्पष्ट करण्यात येते की, वर नमूद केलेले आर्थिक प्रोत्साहन केवळ क्रूझ लाइन जहाजांना लागू होईल आणि रो-रो, फेरी किंवा इतर नियमित प्रवासी सेवांना लागू होणार नाही.

### ११.२. फ्लोटल्स, हाऊसबोट आणि सीप्लेन

ऑफशोअर पर्यटन आणि प्रवास, जोडणी सुधारणे आणि अधिकारक्षेत्रातील पाण्याच्या इष्टतम वापरास प्रोत्साहन देण्याच्या उद्देशाने, महाराष्ट्र सागरी मंडळ हे महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर आणि महाराष्ट्रातील इतर सर्व जलसाठ्यांमध्ये फ्लोटेल्स, सीप्लेन आणि हाऊसबोट चालविण्यास प्रोत्साहित करेल.

फ्लोटेल म्हणजे नद्या, तलाव, खाड्या, बंदरे, धरणे आणि किनारपट्टीवरील पाण्यावर तरंगणारी मनोरंजन आणि विश्रांतीची सुविधा आहे जिथे कोणत्याही प्रकारचे पेय किंवा खाण्यायोग्य पदार्थ पुरवले जाऊ शकतात किंवा नाही. फ्लोटेल्स नांगरलेली जहाजे किंवा फिरती जहाजे असू शकतात.

हाऊसबोट म्हणजे नद्या, तलाव, खाड्या, बंदर, धरणे आणि किनारी पाण्यावर तरंगणारा कोणताही परिसर किंवा परिसराचा भाग, जिथे कोणत्याही प्रकारचे पेय किंवा खाण्यायोग्य पदार्थांसह किंवा त्याशिवाय राहण्याची व्यवस्था केली जाते. हाऊसबोट हे नांगरलेले जहाज किंवा फिरते जहाज असू शकते.

सीप्लेन म्हणजे साधारणपणे, फक्त पाण्यावरून उड्डाण करण्यास आणि पाण्यावर उतरण्यास सक्षम असलेले विमान.

(a) फ्लोटेल्स, हाऊसबोट आणि सीप्लेनच्या विकासाला आणि कार्यचालना प्रोत्साहन देण्यासाठी, महाराष्ट्र सागरी मंडळ खालील उपायांचा अवलंब करेल:

i) आवश्यक असल्यास, नवीन फ्लोटेल्स, हाउसबोट आणि सीप्लेनसाठी भाडेपट्टीचा कालावधी ३० वर्षांपर्यंत असेल. हा भाडेपट्टा कालावधी ५ वर्षांपर्यंत वाढविला जाऊ शकतो.

ii) फ्लोटेल्स, हाऊसबोट आणि सीप्लेनच्या ऑपरेटरना त्यांच्या सर्किटमधील इतर ऑपरेटर्ससह पर्यटन क्रियाकलाप जसे की, जलक्रीडा, किना-यावरील प्रेक्षणीय स्थळांचे मार्गदर्शित टूर, याकरिता भागीदारी करण्यासाठी सहाय्य प्रदान केले जाईल.

iii) सर्व नवीन फ्लोटेल्स, हाऊसबोट आणि सीप्लेनद्वारे देय असलेल्या बंदर करावर २५% सवलत प्रदान केली जाईल.

iv) ग्राहकांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

(b) निविदाकाराला फ्लोटेलचे वाटप खालील पद्धतीने खरेदी प्रक्रियेद्वारे केले जाईल:

i) जेथे प्रकल्प MMB द्वारे ओळखला जातो, तेथे पारदर्शक निविदा प्रक्रिया अवलंबली जाईल.

ii) जेथे विकासकाद्वारे प्रकल्प ओळखला जातो,

- प्रकल्प विकसक/प्रवर्तक खाजगी संस्था असल्यास, स्विस चॅलेंज मार्ग अवलंबला जाऊ शकतो; आणि
- प्रकल्प विकसक सरकारी संस्था /घटक इत्यादी असल्यास, थेट नामांकन केले जाऊ शकते.

### ११.३. उभयचर बसेस, मासेमारी नौका, हार्बर/रिव्हर क्रूझ, फ्लोटींग कॉटेज

महाराष्ट्राची किनारपट्टी आणि अंतर्देशीय जलक्षेत्रात विविध प्रकारच्या क्रूझ आणि जमिनीवर तसेच पाण्यावर चालणा-या उभयचर बसेस सारख्या विश्रांतीच्या क्रियाकलापांसाठी एक समृद्ध केंद्र बनण्याची क्षमता आहे.

(a) मासेमारी करणाऱ्या नौका दिवसभर आपला व्यवसाय करत नाहीत. मच्छिमार समुदायाला त्यांचे उत्पन्न वाढवण्यासाठी तसेच किनारपट्टी व अंतर्देशीय जलक्षेत्रात मनोरंजन सेवांना प्रोत्साहन देण्यासाठी, अशा नौकांना खाली सूचीबद्ध केलेल्या अटींच्या अधीन राहून काम करण्याची परवानगी दिली जाऊ शकते:

i) प्रवासी/माल यांच्या नियमित वाहतूकीला अडथळा होणार नाही, हे लक्षात घेऊन अशा प्रकारच्या क्रियाकलापांसाठी सुविधा, जेटी, वेळ, क्षमता इ. महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे ठरवले जातील.

(b) रिव्हर / हार्बर क्रूझ हा आरामदायी प्रवासाचा एक प्रकार आहे जो प्रवाशांना महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर किंवा अंतर्देशीय पाण्याच्या अनेक महत्त्वाच्या ठिकाणांवर घेऊन जातो. प्रवासी/माल यांच्या नियमित वाहतूकीला अडथळा होणार नाही हे लक्षात घेऊन अशा रिव्हर/ हार्बर क्रूझ पर्यटनांसाठी सुविधा, जेटी, वेळ, क्षमता इ. महाराष्ट्र सागरी मंडळाव्दारे ठरवले जातील.

(c) उभयचर बसेस, मासेमारी नौका, रिव्हर/ हार्बर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज यांच्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळाव्दारे मानक कार्यप्रणाली/तपशीलवार मार्गदर्शक तत्त्वे अंतिम केली जातील आणि त्यास राज्य सरकारकडून मंजूरी दिली जाईल.

(d) प्रदेशातील पर्यटन क्षमता वाढविण्यासाठी, देशांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय पर्यटकांना आकर्षित करण्यासाठी, रोजगाराच्या संधी निर्माण करण्यासाठी आणि स्थानिक अर्थव्यवस्थेला चालना देण्यासाठी राज्य सरकार महाराष्ट्राच्या खाडीकिनारी तरंगत्या कॉटेजच्या (फ्लोटींग कॉटेज) विकासास प्रोत्साहन देईल.

(e) उभयचर बसेस, मासेमारी नौका, रिव्हर/ हार्बर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज यांना प्रोत्साहन देण्यासाठी राज्य सरकार पुढील उपाययोजना करेल:

   (i) उभयचर बसेस, मासेमारी नौका, हार्बर/ रिव्हर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज ऑपरेटरना त्यांच्या सर्किटमधील इतर ऑपरेटर्ससह जलक्रीडा, समुद्रकिनाऱ्यावरील प्रेक्षणिय स्थळांची मार्गदर्शित टूर यासारख्या पर्यटन क्रियाकलापांसाठी भागीदारी करण्यासाठी सहाय्य प्रदान केले जाईल.

   (ii) उभयचर बसेस, मासेमारी नौका, रिव्हर/ हार्बर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज द्वारे देय असलेल्या बंदर करावर २५% सवलत प्रदान केली जाईल.

   (iii) ग्राहकांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

   (iv) उपरोक्त (iii) मध्ये नमूद सवलती व्यतिरिक्त, दिव्यांगांना अतिरिक्त सवलती देण्याबाबतच्या शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सवलती लागू होतील.

### ११.४ जुन्या पाणबुड्या आणि युद्धनौका यांचा पर्यटनासाठी वापर

सेवा कालावधी संपुष्टात आलेल्या (Decommissioned) पाणबुड्या आणि युद्धनौका यांचे ऐतिहासिक महत्त्व ओळखून, किनारी भागात पर्यटन वाढीला चालना देण्यासाठी राज्य सरकार अशा जुन्या पाणबुड्या आणि युद्धनौका यांचा वापर करण्यासाठी प्रोत्साहित करेल.

## १२. शिपयार्ड

जहाजबांधणी आणि जहाज-दुरुस्ती उद्योगांना कुशल कामगार, संबंधित उद्योगांनजीक आणि इतर संबंधित सुविधा दिल्यास, महाराष्ट्रात त्यांची भरभराट होऊ शकते. राज्य सरकारने जहाज बांधणी आणि जहाज-दुरुस्ती उद्योग विकसित करण्यासाठी क्लस्टर-आधारित दृष्टीकोन स्वीकारला आहे.

१२.१ नवीन शिपयार्डसाठी भाडेपट्ट्याचा कालावधी ३० वर्षांपर्यंत असेल.

१२.२ डीपीआर अंतर्गत प्रदान केलेल्या कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनच्या अनुपालनाच्या अधीन, विद्यमान आणि नवीन शिपयार्डसाठी भाडेपट्ट्याचा कालावधी २० वर्षांपर्यंत वाढविला जाऊ शकतो. ही मुदतवाढ राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन असेल आणि भाडेपट्टा कालावधी संपण्याच्या एक वर्ष आधी ऑपरेटरकडून मागणी केली जाईल.

१२.३ शिपयार्डचा ऑपरेटर डीपीआर मध्ये नमूद केलेल्या कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनच्या अनुषंगाने, शिपयार्ड प्रकल्पाच्या प्रगतीचे मोजमाप करणारा त्रैमासिक अहवाल महाराष्ट्र सागरी मंडळाकडे सादर करेल. प्रत्येक शिपयार्ड त्याच्या डीपीआर चे पालन करत आहे किंवा कसे, याचे मूल्यमापन करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ दरवर्षी प्रत्येक शिपयार्डचा आढावा घेईल.

१२.४ शिपयार्ड प्रकल्पाचे निविदाकाराला वाटप पुढील पद्धतीने खरेदी प्रक्रियेद्वारे केले जाईल:

(a) जेथे प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे ओळखला जाईल, तेथे पारदर्शक निविदा प्रक्रिया अवलंबली जाईल.

(b) जेथे विकासकाद्वारे प्रकल्प ओळखला जाईल,

  (i) प्रकल्प विकसक/प्रवर्तक खाजगी संस्था असल्यास, स्विस चॅलेंज मार्ग अवलंबला जाऊ शकतो; आणि

  (ii) प्रकल्प विकसक सरकारी संस्था/घटक इत्यादी असल्यास, थेट नामांकन केले जाऊ शकते.

## १३. मरिना प्रकल्प

मुंबई प्रदेश २०० हून अधिक यॉटस् आणि स्पीडबोट्सची सेवा पुरवतो जे त्याच्या क्षेत्रातून जातात. या बोटी राज्याच्या पर्यटनाला चालना देत असताना आणि शहरी गरजाही पूर्ण करत असताना, मुंबई बंदर क्षेत्रात अनेकदा वाहतूक कोंडी निर्माण होते. हे महाराष्ट्रासाठी सुसज्ज मरिना धोरणाची गरज अधोरेखित करते.

१३.१ मरिना प्रकल्पांसाठी भाडेपट्टा कालावधी ३० वर्षांचा असेल.

१३.२ डीपीआर अंतर्गत नमूद केलेला कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनचे अनुपालन करण्याच्या अधीन, विद्यमान आणि नवीन मरीना प्रकल्पांसाठी भाडेपट्टीचा कालावधी २० वर्षांपर्यंत वाढविला जाऊ शकतो. ही मुदतवाढ राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन असेल आणि भाडेपट्टयाचा कालावधी संपण्याच्या एक वर्ष आधी ऑपरेटरकडून मागणी केली जाईल.

१३.३ प्रकल्पाची क्षमता वाढवणे आणि गुंतवणुकीची वचनबद्धता यासारख्या घटकांचा विचार करून राज्य सरकारकडून मुदतवाढीची मंजूरी दिली जाईल.

१३.४ निविदाकाराला मरीना प्रकल्पांचे वाटप पुढील पद्धतीने खरेदी प्रक्रियेद्वारे केले जाईल:

(a) जेथे प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे ओळखला जाईल, तेथे पारदर्शक निविदा प्रक्रिया अवलंबली जाईल.

(b) जेथे विकासकाद्वारे प्रकल्प ओळखला जाईल,

i) प्रकल्प विकसक/प्रवर्तक खाजगी संस्था असल्यास, स्विस चॅलेंज मार्ग अवलंबला जाऊ शकतो; आणि

ii) प्रकल्प विकसक सरकारी संस्था / घटक इत्यादी असल्यास, थेट नामांकन केले जाऊ शकते.

## १४. जहाज पुनर्वापर सुविधा

भारत हा Hong Kong International Convention for the Safe and Environmentally Sound Recycling of Ships, २००९ चा पक्ष आहे, ज्याने मानवी आरोग्य, सुरक्षितता आणि पर्यावरणाला कोणतेही अनावश्यक धोके निर्माण होणार नाहीत, याची खात्री करून जहाजाच्या पुनर्वापराच्या पद्धतीत क्रांती घडवून आणली. जहाज पुनर्वापर सुविधा श्रम-केंद्रित आहेत आणि रोजगाराच्या भरीव संधी निर्माण करतात. मात्र, महाराष्ट्रात आजपर्यंत जहाज पुनर्वापराचा प्रकल्प नाही.

१४.१ राज्याच्या किनारपट्टीवर जहाज पुनर्वापर सुविधा विकसित करण्यासाठी योग्य ठिकाणे विकसक किंवा महाराष्ट्र सागरी मंडळ/राज्य सरकारद्वारे ओळखली जाऊ शकतात.

१४.२ जहाज पुनर्वापर सुविधेसाठी भाडेपट्टा कालावधी ३० वर्षांचा असेल.

१४.३ डीपीआर अंतर्गत नमूद केलेला कामाचा वाव आणि मास्टर प्लॅनचे अनुपालन करण्याच्या अधीन, जहाज पुनर्वापराच्या सुविधेसाठी भाडेपट्टीचा कालावधी ३० वर्षांसाठी वाढविला जाऊ शकतो. ही मुदतवाढ राज्य सरकारच्या मान्यतेच्या अधीन असेल आणि भाडेपट्टा कालावधी संपण्याच्या एक वर्ष आधी ऑपरेटरकडून मागणी केली जाईल.

१४.४ प्रकल्पाची क्षमता वाढवणे आणि गुंतवणुकीची वचनबद्धता यासारख्या घटकांचा विचार करून राज्य सरकारकडून मुदतवाढीची मंजूरी दिली जाईल.

१४.५ जहाज पुनर्वापर सुविधांचे वाटप निविदाकाराला खालील पद्धतीने खरेदी प्रक्रियेद्वारे केले जाईल:

(a) जेथे प्रकल्प महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे ओळखला जाईल, तेथे पारदर्शक बोली प्रक्रिया अवलंबली जाईल.

(b) जेथे विकासकाद्वारे प्रकल्प ओळखला जाईल,

  (i) प्रकल्प विकसक/प्रवर्तक खाजगी संस्था असल्यास, स्विस चॅलेंज मार्ग अवलंबला जाऊ शकतो; आणि

  (ii) प्रकल्प विकसक सरकारी संस्था / घटक इत्यादी असल्यास, थेट नामांकन केले जाऊ शकते.

## भाग - ड

### १५. सागरी प्रकल्पांसाठी जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप

१५.१ सागरी प्रकल्पांसाठी जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळामध्ये महसूल सेल तयार केला जाईल.

### १५.२ विद्यमान सरकारी जमिनीचे मूल्यांकन आणि वाटप

(a) जर प्रकल्पाच्या विकास क्षेत्रामध्ये राज्य सरकारच्या जमिनीचा समावेश असेल, तर अशी जमीन महाराष्ट्र सागरी मंडळाकडे राज्य सरकारकडून प्रतिवर्ष रुपये १/- च्या नाममात्र भाडेतत्वावर हस्तांतरित केली जाईल.

(b) अशा राज्य सरकारी जमिनीचे मूल्यांकन महाराष्ट्र सागरी मंडळाकडून रेडी रेकनर दरानुसार केले जाईल.

### १५.३ आंतरभरती जमिनीचे (Inter Tidal Zone Land) मूल्यांकन आणि वाटप

(a) आंतरभरती जमिनीचे मूल्यांकन आणि सागरी प्रकल्पांना वाटप करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळा जबाबदार प्राधिकरण असेल.

(b) आंतरभरती जमिनीचे मूल्यांकन सदर आंतरभरती जमिनीला लागून असलेल्या जिरायती जमिनीच्या रेडी रेकनर दरानुसार निश्चित केले जाईल.

(c) मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे आणि नवी मुंबई या जिल्ह्यांमध्ये असलेल्या बंदर प्रकल्पांसाठी महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे ऑपरेटरला आंतरभरती जमीन उपलब्ध करून देण्यासाठी, या जमिनीची किंमत पुढील मूल्यांकनाप्रमाणे अगोदर (अपफ्रंट) घेतले जाईल:

(i) २० वर्षांपर्यंतचा करार असलेल्या ऑपरेटरकडून रेडी रेकनरनुसार परिगणित केलेल्या मूल्यांकनाच्या रकमेच्या एक चतुर्थांश (¼) इतकी रक्कम वसूल करण्यात यावी.

(ii) ३५ वर्षांपर्यंतचा करार असलेल्या ऑपरेटरकडून रेडी रेकनरनुसार परिगणित केलेल्या मूल्यांकनाच्या रकमेच्या एक तृतीयांश (⅓) इतकी रक्कम वसूल करण्यात यावी.

(iii) ५० वर्षांपर्यंतचा करार असलेल्या ऑपरेटरकडून रेडी रेकनरनुसार परिगणित केलेल्या मूल्यांकनाच्या रकमेपैकी अर्धी (½) रक्कम वसूल करण्यात यावी.

(iv) ५० वर्षांच्या कालावधीच्या पुढे, मूल्यांकन रक्कम वरील (i) ते (iii) मध्ये ओळखल्या गेलेल्या तत्त्वांनुसार परिगणित केली जाईल.

१५.४ खंड १५.३(b) किंवा खंड १५.३(c) नुसार निर्धारित केलेल्या जमिनीच्या किंमतीएवढी रक्कम ऑपरेटरकडून अगोदर (अपफ्रंट) वसूल केल्यानंतर, अशी जमीन ऑपरेटरला वार्षिक रुपये १/- इतक्या नाममात्र भाडेपट्ट्याने दिली जाईल.

१५.५ राज्य सरकारी/ आंतरभरती जमिनीची मालकी, यथास्थिती लागू असेल त्याप्रमाणे, राज्य सरकार/महाराष्ट्र सागरी मंडळाकडे राहील.

१५.६ जर प्रकल्प विकास क्षेत्र / आराखडा यामध्ये स्थित जमिनीचे क्षेत्र खरेदी करण्यास ऑपरेटर सक्षम नसेल तर, राज्य सरकार त्यांना जमीन संपादनात मदत करेल.

## १६. मुदतवाढीच्या वेळी मूल्यांकन आणि वाटप

१६.१ सवलतीचा कालावधी किंवा भाडेपट्ट्याचा कालावधी वाढविण्याच्या बाबतीत, यथास्थिती असेल त्याप्रमाणे, जमीन, वाटप केलेले क्षेत्र इत्यादीसाठीचे मूल्यांकनाची रक्कम भरण्यासाठी सवलतधारक/ भाडेपट्टाधारक खालीलपैकी एक पर्याय निवडू शकतात:

a) भाडेपट्टाधारक /सवलतधारक विद्यमान भाडेपट्टा/सवलत करारांतर्गत परिभाषित केलेल्या प्रक्रियेनुसार रक्कम भरणा करणे सुरू ठेवतील.

**किंवा**

b) खालील बाबींना अधीन राहून, MMDP-२०२३ च्या प्रकरण-१५ अंतर्गत परिभाषित केलेल्या प्रक्रियेनुसार:

(i) १० वर्षांपर्यंत, वरीलप्रमाणे परिगणित केलेल्या मूल्यांकन रकमेचा १/३ भाग.

(ii) २० वर्षांपर्यंत, वरील प्रमाणे परिगणित केलेल्या मूल्यांकन रकमेचा २/३ भाग.

(iii) ३० वर्षांपर्यंत, वरील प्रमाणे परिगणित केलेली १००% मूल्यांकन रक्कम.

(iv) परिगणना केलेली रक्कम वाढीव कालावधीसाठी वार्षिक हप्त्यांमध्ये, मूल्यांकन रकमेवर वार्षिक ४% वाढीच्या अधीन, अदा केली जाऊ शकते किंवा मुदतवाढीच्या वेळी एकरकमी अदा केली जाऊ शकते.

## १७. मालमत्ता मुद्रीकरण

१७.१ सध्या, महाराष्ट्र सागरी मंडळाकडे जमीन आणि इमारतींच्या स्वरूपातील अतिरिक्त, न वापरलेली आणि कमी वापरात असलेली मालमत्ता आहे. या अतिरिक्त जमीन आणि मालमत्तेच्या किंमतीचा योग्य मोबदला मिळण्याकरिता त्यांचे मुद्रीकरण करणे महत्वाचे आहे.

१७.२ महाराष्ट्र सागरी मंडळ त्यांच्या अतिरिक्त मालमत्तेची ओळख करून जास्तीत जास्त मूल्य प्राप्ती करण्यासाठी व्यावसायिक आणि कार्यक्षम पद्धतीने कमाई करण्याचा प्रयत्न करेल.

१७.३ रिअल इस्टेट बाजारपेठेतील संशोधन, कायदेशीर योग्य परिश्रम, मूल्यांकन, मास्टर प्लॅनिंग, इन्व्हेस्टमेंट बँकिंग, लँड मॅनेजमेंट इत्यादींमध्ये मालमत्ता मुद्रीकरणासाठी आवश्यक असलेली विशेष कौशल्ये आणि कौशल्याची विस्तृत श्रेणी ओळखून. महाराष्ट्र सागरी मंडळ खाजगी क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींची सेवा घेऊ शकते.

१७.४ महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर मनोरंजन, पर्यटन, करमणूक, आदरातिथ्य इत्यादींना प्रोत्साहन देण्यासाठी सरकारी, निमशासकीय किंवा खाजगी घटकांच्या सहकार्याने सरकारी जमीन, महाराष्ट्र सागरी मंडळाच्या मालकीची जमीन आणि महाराष्ट्र सागरी मंडळाच्या जेट्टी यांचा सर्वोत्तम वापर करण्याचा महाराष्ट्र सागरी मंडळ प्रयत्न करेल. या उद्देशासाठी, राज्य सरकार उच्चतम भरती रेषेपासून ५० यार्डांच्या आत असलेली सर्व जमीन नाममात्र किमतीत महाराष्ट्र सागरी मंडळाकडे हस्तांतरित करेल.

१७.५ महाराष्ट्र सागरी मंडळ हे जमीन, इमारत किंवा पाण्याच्या स्वरूपातील मालमत्ता ओळखण्याचा प्रयत्न करेल जिथे अक्षय उर्जेचे स्त्रोत उदाहरणार्थ, तरंगते सौर पॅनेल, सौर ग्रिड, लहरी ऊर्जा आणि भरती-ओहोटी ऊर्जा इत्यादी स्थापित केल्या जाऊ शकतात.

## १८. पाइपलाइन शुल्क/वे लीव्ह शुल्क/इतर शुल्क / ड्राफ्ट प्रिमियम शुल्क

### १८.१ पाइपलाइन/ ऑप्टिकल फायबर केबलचे शुल्क

**श्रेणी-१** : जर पाइपलाइन किंवा ऑप्टिकल फायबर केबल महाराष्ट्र सागरी मंडळाच्या अधिकारक्षेत्रातील पाण्यातून जात असेल व महाराष्ट्राच्या किनारपट्टीवर बंदर हद्दीत येत असेल, तर सुविधा भरपाई शुल्क खालीलप्रमाणे वसूल केले जाईल:

| **पाइपलाइन/केबल मधून वाहून नेला जाणारा माल** | **सुविधा भरपाई शुल्क** |
|---|---|
| क्रूड | १०.२५५ (INR/MT) |
| पीओएल, एलपीजी, एलएनजी, सीएनजी, लिक्विड केमिकल्स इ. | २६.९१८ (INR/MT) |
| ऑप्टिकल फायबर केबल | INR ९.१ लाख/ रनिंग किमी/वार्षिक |

**श्रेणी-२** : जर पाइपलाइन किंवा ऑप्टिकल फायबर केबल महाराष्ट्र सागरी मंडळाच्या अधिकारक्षेत्रातील पाण्यातून जात असेल व महाराष्ट्राच्या किना-याव्यतिरिक्त अन्य ठिकाणी येत असेल, तर INR ९.१ लाख/रनिंग किमी/वार्षिक रॉयल्टी देय असेल.

टिपा:

(a) पाण्याच्या पाइपलाइनच्या बाबतीत; १८.२ मध्ये नमूद केलेले केवळ वार्षिक वे लिव्ह चार्जेस लागू होतील.
(b) ज्या पाइपलाइनसाठी व्हार्फेज शुल्क आकारले जाते, त्या पाइपलाइनसाठी पाइपलाइन शुल्क लागू होणार नाही.
(c) वर नमूद केलेली रॉयल्टी/शुल्क दरवर्षी १ एप्रिल रोजी ६% ने वाढवले जाईल.

### १८.२ वर नमूद केलेल्या पाइपलाइन आणि ऑप्टिकल फायबर केबलवर वार्षिक वे लिव्ह शुल्क लागू होईल

(i) **जमिनीच्या बाजूसाठी:** व्याप्त क्षेत्र (बंदर हद्दीत) X दरवर्षी ४% वाढीसह, आंतर भरती जमिनीच्या लगत असलेल्या जिरायत जमिनीच्या रेडी रेकनरच्या ६%

(ii) **समुद्राच्या बाजूसाठी:** व्याप्त क्षेत्र X दरवर्षी ४% वाढीसह, आंतर भरती जमिनीच्या लगत असलेल्या जिरायत जमिनीच्या रेडी रेकनरच्या ६% च्या ६०%.

(iii) मुंबई शहर, मुंबई उपनगर, ठाणे आणि नवी मुंबई या जिल्ह्यांमध्ये असलेल्या आंतरभरती जमिनीसाठी, रेडी रेकनर प्रमाणे येणा-या मूल्यांकन रकमेच्या एक चतुर्थांश (१/४) रकमेवर ६% प्रमाणे परिगणित करण्यात येईल.

टीप: जर जमिनीकडील रेडी रेकनर मूल्य पाण्याच्या साठ्याच्या दोन्ही बाजूंना भिन्न असेल तर जास्त मूल्य असलेल्या बाजूच्या रेडी रेकनरचा विचार केला जाईल.

**१८.३ श्रेणी-१ आणि श्रेणी-२ या दोन्हीसाठी लागू असलेले इतर शुल्क**

| अ.क्र. | शुल्क आकारणीचे लेखाशिर्ष | शुल्क लागू करण्याचा आधार |
|---|---|---|
| १ | कमिशनिंग दरम्यान पर्यवेक्षण शुल्क | बांधकाम खर्चासाठी-<br>(a) रु. ५० कोटी पर्यंत- बांधकामाच्या एकूण खर्चाच्या १%<br>(b) रु. ५० कोटी पेक्षा जास्त - रुपये ७५ लाख |
| २ | छाननी शुल्क | बांधकाम खर्चासाठी-<br>(a) रु. ५० कोटी पर्यंत- बांधकामाच्या एकूण खर्चाच्या १%<br>(b) रु. ५० कोटी पेक्षा जास्त - रुपये ७५ लाख |
| ३ | टाकणी/उभारणी शुल्क | काढणे, विल्हेवाट लावणे आणि मूळ स्थितीत पुनर्स्थापित करणे यासाठी येणारा अंदाजित खर्च अनामत रक्कम म्हणून घेणे. |
| ४ | प्रस्ताव मंजूरी संबंधित शुल्क | वास्तविक नुसार (कराराची पूर्वतयारी आणि सेवा शुल्क, करार अंमलबजावणीसाठी कायदेशीर खर्च इ.) |

**१८.४ ड्राफ्ट प्रीमियम शुल्क**

कोणत्याही बंदर प्रकल्पाच्या विकासावर वार्षिक ड्राफ्ट प्रीमियम आकारला जाऊ शकतो. असे शुल्क आकारण्याचे तपशील आणि कार्यपद्धती उच्चाधिकार समिती (HPC) द्वारे निश्चित केली जाईल.

# भाग - इ

## १९. बंदरावर आधारित औद्योगिक विकास

बंदर प्रणाली आणि उद्योग यांच्यातील सहजीवन संबंधाच्या बाजूने आंतरराष्ट्रीय बंदरांकडून पुरेसे अनुभवजन्य पुरावे आहेत. साहजिकच, औद्योगिक विकासाचे सागरी विकासासह समक्रमण हे महाराष्ट्रातील बंदरांना दिल्या जाणा-या इतर कोणत्याही वित्तीय किंवा गैर-आर्थिक प्रोत्साहनापेक्षा अधिक परिणामकारक असेल.

१९.१ महाराष्ट्रातील उद्योग आणि सागरी क्षेत्राचा विकास समक्रमित करण्यासाठी, राज्य सरकार हे करेल:

a) महाराष्ट्रातील विद्यमान आणि आगामी बंदर प्रकल्पासाठी राज्य सरकार, विशेष नियोजन प्राधिकरण स्थापन करील. या प्राधिकरणास "बंदर क्षेत्र विकास प्राधिकरण" (Port Area Development Authority - PADA) असे संबोधण्यात येईल. PADA द्वारे आर्थिक, सामाजिक, पर्यावरणीय, पर्यटन आणि इतर संबंधित बाबींवर लक्ष केंद्रीत करुन बंदरे आणि त्याच्या आसपासच्या क्षेत्रांचे सर्वांगीण पध्दतीने प्रभावी नियोजन करण्यात येईल.

b) कोस्टल इंडस्ट्रियल कॉरिडॉरच्या विकासाला प्रोत्साहन देण्यात येईल ज्यामुळे मालाची मागणी वाढेल.

c) बंदरावर-आधारित SEZs किंवा FTWZs च्या विकासाला हिंटरलँड प्रदेशात प्रोत्साहन देण्यात येईल.

d) राज्याच्या औद्योगिक धोरणांतर्गत अशा सागरी क्लस्टर्समधील उद्योगांना योग्य प्रोत्साहन देऊन हिंटरलँड प्रदेशांमध्ये सागरी क्लस्टर्सच्या विकासास प्रोत्साहन देण्यात येईल.

e) विद्यमान सागरी क्लस्टर्ससह बंदर जोडणीला (पोर्ट लिंकेज) प्रोत्साहन देण्यात येईल.

f) सर्व मोठ्या, मेगा आणि मध्यम बंदराशेजारील औद्योगिक वसाहतींसाठी महाराष्ट्र सागरी मंडळ/ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांच्यामार्फत वाटाघाटीनुसार जमीन संपादित करण्यात येईल.

### १९.२ सागरी क्लस्टर्स खालील बाबी सामावून घेऊ शकतात:

(a) **निर्यात/आयात-आधारित औद्योगिक क्लस्टर** : तयार मालाच्या उत्पादनासाठी आयात करावयाच्या कच्च्या मालावर अवलंबून असलेल्या उद्योगांना जमीन संपादन करण्यास राज्य सरकार मदत करून त्यांच्या विकासास प्रोत्साहन देईल. केंद्र सरकारच्या सहकार्याने बंदराच्या परिसरात SEZ/FTWZ ची स्थापना करून निर्यात-केंद्रित युनिट्सना प्रोत्साहन दिले जाऊ शकते.

(b) **लॉजिस्टिक सर्व्हिस क्लस्टर्स** : राज्य सरकार, भूसंपादनात मदत करून, बंदरात अधिक मालवाहतूक करण्यासाठी बंदराच्या परिसरात लॉजिस्टिक सेवा क्लस्टर्सच्या विकासास प्रोत्साहन देईल.

### १९.३ महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाची भूमिका :-

बंदराच्या पायाभूत सुविधा आणि वाहतूक नेटवर्कचा वापर करून बंदरप्रणीत औद्योगिक विकासाला चालना देण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ महत्त्वपूर्ण भूमिका बजावू शकते. महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ बंदरप्रणीत औद्योगिक विकासासाठी खालीलप्रमाणे भूमिका बजावू शकेल:

a) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ हे महाराष्ट्र सागरी मंडळासोबत वाटाघाटी करुन, मोठ्या, मेगा आणि मध्यम बंदरांच्या शेजारी औद्योगिक वसाहतींसाठी जमीन संपादीत करेल व तेथे पायाभूत सुविधांचा विकास करेल.

b) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत, बंदरावर आधारित कोस्टल विशेष आर्थिक क्षेत्राच्या विकासाला चालना देण्यात येईल. त्यामुळे अतिरिक्त आर्थिक क्रियाशीलतेमध्ये वाढ होईल, वस्तू आणि सेवांच्या निर्यातीला चालना मिळेल, माल वाहतूक वाढेल आणि शासनाच्या महसूलात भर पडेल. कोस्टल विशेष आर्थिक क्षेत्राच्या स्पर्धात्मक स्थानामुळे वाहतूकीचा खर्च कमी होण्यास मदत होईल, त्याव्दारे भारतीय व्यापार जागतिक स्तरावर स्पर्धात्मक होण्यास अधिक सक्षम होईल. आणि त्याव्दारे भारत सरकारच्या 'मेक इन इंडिया' उपक्रमांतर्गत उत्पादन आणि औद्योगिकीकरणाला पाठबळ मिळेल.

c) राज्याचे लॉजिस्टिक्स पार्क धोरण-२०१८ अंतर्गत राज्यात २५ मल्टी-मोडल इंटिग्रेटेड लॉजिस्टिक पार्क विकसित करण्याचे उद्दिष्ट महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत निश्चीत करण्यात आले आहे. राज्यातील लॉजिस्टीक पार्क हे बंदरांना जोडले गेल्याने वाहतूकीवर होणारा खर्च कमी होईल, निर्यात-केंद्रित गुंतवणूकदारांना प्रोत्साहन मिळेल, वितरण वेळेत सुधारणा होईल आणि कार्यक्षमतेत वाढ होईल.

d) बंदरांच्या नजीक असलेल्या कोस्टल विशेष आर्थिक क्षेत्र व कोस्टल इंडस्ट्रियल कॉरिडॉरच्या विकासाला चालना देणे, नवीन टर्मिनल्स बांधणे, विद्यमान सुविधांमध्ये सुधारणा करणे आणि मालाचे हस्तांतरण क्षमता वाढविण्यासाठी नवीन उपकरणे आणि तंत्रज्ञानामध्ये गुंतवणूक करण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ मदत करेल. त्याकरिता महामंडळामार्फत जागा, पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच सदर प्रयोजनार्थ विविध पायाभूत सोयी-सुविधा उभारण्यासाठी राज्याचे विविध विभागामार्फत आवश्यक परवानग्या प्राप्त करण्याकामी सहयोग करेल. उदा. महावितरण, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ, वन विभाग इ.

e) राज्याच्या औद्योगिक धोरणांतर्गत, गुंतवणुकदारांना प्रोत्साहने देऊन त्यांना सागरी विकास औद्योगिक समूहामध्ये सहभागी होण्यासाठी प्रोत्साहित करण्यात येईल तसेच निर्यातीला चालना देण्यासाठी निर्यात-केंद्रीत यूनिट्स (EOUs) ची स्थापना महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत करण्यात येईल. एक जिल्हा, एक उत्पादन (ODOP) च्या माध्यमातून, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ त्यांचे औद्योगिक घटक बंदराजवळ स्थापन करून स्थानिक व्यवसायांना पाठिंबा देऊन, रोजगाराच्या संधी निर्माण करून आणि स्थानिक समुदायामध्ये गुंतवणूक करून आर्थिक विकासाला प्रोत्साहन देऊन स्थानिक उत्पादनांच्या निर्मितीला प्रोत्साहन देईल.

## २०. कौशल्य विकास

### २०.१ कौशल्य विकासाद्वारे सुरक्षित आणि शाश्वत बंदरांच्या विकासासाठी प्रोत्साहन

(a) कुशल कामगार आणि मानव संसाधन विकासाची मागणी पूर्ण करण्यासाठी खाजगी क्षेत्रात किंवा खाजगी क्षेत्राच्या सहभागाने शैक्षणिक संस्था आणि कौशल्य विकास केंद्रे उभारण्यासाठी, जमीन वगळून, प्रकल्प खर्चाच्या ६०% पर्यंत किंवा रुपये ५० लाख, यापैकी जे कमी असेल ते भांडवली सहाय्य महाराष्ट्र सागरी मंडळाद्वारे दिले जाईल.

(b) सामुदायिक सामाजिक उत्तरदायित्व उपक्रमांचा एक भाग म्हणून कौशल्य विकासासाठी निधी देण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ ऑपरेटर्सना प्रोत्साहित करेल.

### २०.२ महाराष्ट्र सागरी विद्यापीठ

पुरेशा कुशल मनुष्यबळाचा अभाव असल्यामुळे सध्या भारतातील सागरी उद्योगाच्या विकासात अडथळा येत आहे. सागरी उद्योगाची क्षमता वाढवण्यासाठी जागतिक उत्कृष्टतेच्या केंद्राची आवश्यकता आहे. त्यामुळे भारतातील सागरी शिक्षण, संशोधन व विकास आणि व्यावसायिक प्रशिक्षणाला चालना देण्यासाठी राज्य सरकार महाराष्ट्र सागरी विद्यापीठ स्थापन करेल.

हे विद्यापीठ सागरी मूल्य साखळीतील व्यावसायिक पैलू जसे की, सागरी कायदा, जहाजवाहतूक वित्तपुरवठा व अर्थशास्त्र, सागरी व्यवस्थापन, वाहतूक व्यवस्था (लॉजिस्टिक्स), जहाज ब्रोकिंग, जहाजांकरिता वित्तपुरवठा, जहाजे भाड्याने घेणे आणि जहाज व्यवस्थापन अशा काही कार्यक्रमांचा अभ्यास करण्याची संधी देईल.

महाराष्ट्र सागरी विद्यापीठाची उद्दिष्टे पुढीलप्रमाणे असतील.

(a) समुद्रशास्त्र, सागरी इतिहास, सागरी कायदे, सागरी सुरक्षा, धोकादायक मालाची वाहतूक, पर्यावरण अभ्यास आणि इतर संबंधित क्षेत्रांसारख्या सागरी अभ्यासाच्या उदयोन्मुख क्षेत्रांवर सागरी अभ्यास, प्रशिक्षण आणि संशोधन सुलभ करणे आणि प्रोत्साहन देणे;

(b) विद्यापीठाच्या शैक्षणिक कार्यक्रमांमध्ये संस्थात्मक आणि संशोधन सुविधा प्रदान करणे आणि विज्ञान, तंत्रज्ञान आणि इतर संलग्न विषयांमधील एकात्मिक अभ्यासक्रमांसाठी तरतूद करणे;

(c) विद्यापीठाला विकासाच्या स्थानिक, प्रादेशिक आणि राष्ट्रीय समस्यांशी संलग्न करुन व्यक्ती आणि समाजाच्या विकासासाठी ज्ञान आणि कौशल्यांचे फायदे वाढवणे;

(d) सागरी उद्योग आणि भारतातील लोकांचे आर्थिक हितसंबंध आणि कल्याणासाठी विशेष लक्ष देणे.

## २१. शाश्वत सागरी विकास

केंद्र शासनामार्फत जारी करण्यात आलेली नवीनतम "हरीत सागर"-ग्रीन पोर्ट मार्गदर्शक तत्त्वे किंवा वेळोवेळी जाहीर करण्यात येणारी इतर मार्गदर्शक तत्त्वे यांचे पालन करण्यासाठी महाराष्ट्र सागरी मंडळ ऑपरेटर्सना प्रोत्साहित करेल.

## २२. मच्छीमारांना भरपाई

सागरी प्रकल्पांमुळे मच्छिमारांच्या उपजिविकेवर परिणाम होत असल्यास, अशा मच्छिमारांना नुकसान भरपाई देण्यासाठी मत्स्यव्यवसाय विभागामार्फत जारी करण्यात आलेल्या राज्यस्तरीय नुकसान भरपाई संदर्भातील प्रचलित धोरणाचा अवलंब करण्यात येईल.

# भाग - फ

## २३. सागरी विकासासाठी प्रोत्साहने

सागरी प्रकल्प हाती घेण्याकरिता खाजगी क्षेत्राला सहाय्य करण्यासाठी आणि इतर किनारी राज्यांच्या तुलनेत त्याचा स्पर्धात्मक फायदा सुधारण्यासाठी, राज्य सरकार सागरी प्रकल्पांना प्रोत्साहन देईल.

### २३.१ बंदर प्रकल्पांसाठी प्रोत्साहने

(a) **विनंती केलेल्या प्रकल्पांसाठी पर्यावरणीय प्रभाव मूल्यांकनासाठी संदर्भ अटींची (Terms of Reference) मान्यता:** तांत्रिक-आर्थिक सुसाध्यता अहवालाच्या मंजूरीनंतर, केंद्रीय पर्यावरण व वने मंत्रालयाने निश्चित केलेल्या विद्यमान नियम/मार्गदर्शक तत्त्वांनुसार, महाराष्ट्र सागरी मंडळ / राज्य सरकार प्रस्तावित संदर्भ अटी आणि आवश्यक कागदपत्रे यासह पर्यावरणीय प्रभाव मूल्यांकनासाठी (EIAR) केंद्रीय पर्यावरण व वने मंत्रालयाकडे प्रस्ताव पाठवेल. पर्यावरणीय प्रभाव मूल्यांकनासाठी साठी प्रस्तावित **Terms of Reference** ची मान्यता महाराष्ट्र सागरी मंडळ/ राज्य सरकार प्राप्त करेल.

(b) **बंदर प्रकल्पांसाठी आर्थिक प्रोत्साहने:** खाजगी सहभागातून बंदरांच्या विकासाला चालना देण्यासाठी, राज्य सरकार राज्यातील बंदर प्रकल्पांना आर्थिक प्रोत्साहनांचा एक संच प्रदान करेल. यात पुढील बाबी समाविष्ट असतील:

   (i) **गौण खनिजांवरील स्वामीत्वधनातून सूट** - बंदर प्रकल्प, संबंधित बांधकाम, रस्ते जोडणी, रेल्वे जोडणी, पाणीपुरवठा, वीजपुरवठा, दूरसंचार आणि बंदर प्रकल्पांच्या इतर संबंधित क्रियाकलापांच्या विकासासाठी काढलेल्या आणि वापरल्या जाणा-या गौण खनिजांवर स्वामीत्वधन (रॉयल्टी) आकारली जाणार नाही.

   (ii) **अकृषीक मूल्यमापन शुल्क आकारणीपासून सूट** - बंदर प्रकल्पांच्या आणि इतर बंदर-संबंधित क्रियाकलापांच्या जसे की, जेट्टी, गोडाऊन, कंट्रोल टॉवर, विद्युत पुरवठा, पाणीपुरवठा, सांडपाणी प्रक्रिया, प्रशासकीय इमारती व बंदराशी संबंधित इतर बाबी इत्यादींच्या कार्यान्वित वापरासाठी जमिनीचा वापर बदलल्यास, अशा कामांसाठी अकृषिक मूल्यमापन शुल्क आकारले जाणार नाही.

**(iii) वीज शुल्कातून सूट -** बंदर प्रकल्पांच्या बांधकाम टप्प्यात विजेच्या वापरावर विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

**(iv) मुद्रांक शुल्कातून सवलत:** बंदर प्रकल्पांच्या विकास, कार्यचालन आणि देखरेखीशी संबंधित सर्व प्रथम साधनांसाठी मुद्रांक शुल्क आकारले जाणार नाही, ज्यात रस्ते जोडणी, रेल्वे जोडणी, पाणीपुरवठा, विद्युत वीज पुरवठा, दूरसंचार आणि इतर संबंधित क्रियाकलापांचा समावेश आहे.

**(v) सार्वजनिक-खाजगी बंदरांना औद्योगिक वीज दर लागू करणे:** बंदर प्रकल्पांसाठी औद्योगिक वीज दर आकारण्याचा प्रस्ताव आहे. त्याकरीता ऑपरेटरला महाराष्ट्र सागरी मंडळ/गृह विभाग यांचेमार्फत मा. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडे याचिका दाखल करावी लागेल. मा.आयोगाने मान्यता दिल्यानंतर ही सवलत लागू होईल.

**(vi) बंदर प्रकल्पांच्या बांधकाम टप्प्यात आवश्यक असलेल्या इनपुटसाठी राज्य वस्तू आणि सेवा कर सूट:** बंदर प्रकल्पांच्या बांधकाम टप्प्यात आवश्यक असलेल्या इनपुटवर राज्य वस्तू आणि सेवा कर ("SGST ") सूट दिली जाईल.

**(vii) बंदर करातून सूट:** नवीन बंदर प्रकल्पांसाठी बंदर कर आकारला जाणार नाही.

**(c) बंदर प्रकल्पांसाठी सानुकूलित प्रोत्साहन पॅकेज (Customised Incentive Package)**

(i) रोजगार निर्मिती, गुंतवणूक आणि क्षमतावाढ यादृष्टीने बंदरांचे महत्त्वपूर्ण फायदे लक्षात घेऊन, महाराष्ट्रात मोठ्या आकाराच्या बंदर प्रकल्पांना प्रोत्साहन देण्याचे राज्य सरकारचे उद्दिष्ट आहे. याच्या अनुषंगाने, मोठ्या आणि मेगा बंदरांना सानुकूलित प्रोत्साहन पॅकेजच्या स्वरूपात अतिरिक्त वित्तीय प्रोत्साहन दिले जाऊ शकते.

(ii) मोठ्या आणि मेगा पोर्ट्सना सानुकूलित प्रोत्साहन पॅकेज तेव्हाच प्राप्त होईल जर ऑपरेटरने सादर केलेल्या डीपीआर आणि सवलत करारामध्ये नमूद केल्यानुसार संदर्भ अटींबाबतच्या (Terms of Reference) वचनबद्धतेचे पालन केले असेल. सानुकूलित प्रोत्साहन पॅकेज कोणत्या टप्प्यावर प्रदान करायचे याचा निर्णय उच्चाधिकार समिती घेईल.

(iii) मोठ्या आणि मेगा बंदरांना द्यावयाच्या सानुकूलित प्रोत्साहन पॅकेजवर उच्चाधिकार समिती विचारविनिमय करेल.

(iv) सानुकूलित प्रोत्साहन पॅकेजमध्ये इतर गोष्टींबरोबरच, बंदराशी संबंधित ऑपरेशन्सवर राज्य वस्तू व सेवा कराची (SGST) ची प्रतिपूर्ती, WFR वाढीवरील सवलती, कलम २४.१(d) अंतर्गत प्रदान केलेल्या मर्यादांमध्ये शिथिलता आणि उच्चाधिकार समितीव्दारे ठरवल्या जाणाऱ्या इतर सवलती यांचा समावेश असू शकतो.

**(d) वित्तीय प्रोत्साहनांवर मर्यादा**

(i) कलम २३.१(b) अंतर्गत नमूद करण्यात आलेली आर्थिक प्रोत्साहने मायक्रो (Micro), लघु (Small) आणि मध्यम (Medium) बंदरांना पुढील कालावधीपर्यंत प्रदान केली जातील:

- वरील बंदरांना देण्यात आलेल्या प्रोत्साहनांचे एकत्रित मूल्य हे एकूण स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) च्या ५०% एवढे होईपर्यंत, किंवा
- आर्थिक आकृतिबंध (फायनान्शियल क्लोजर) पूर्ण होण्याच्या तारखेपासून ७ वर्षांचा कालावधी होईपर्यंत,

यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत.

(ii) कलम २३.१(b) आणि २३.१(c) अंतर्गत आर्थिक प्रोत्साहन मोठ्या आणि मेगा बंदरांना पुढील कालावधीपर्यंत प्रदान केली जातील:

- वरील बंदरांना देण्यात आलेल्या प्रोत्साहनांचे एकत्रित मूल्य हे एकूण स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) च्या ७५% एवढे होईपर्यंत, किंवा
- आर्थिक आकृतिबंध (फायनान्शियल क्लोजर) पूर्ण होण्याच्या तारखेपासून ७ वर्षांचा कालावधी होईपर्यंत,

यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत.

## २३.२ विद्यमान प्रकल्पांसाठी प्रोत्साहन

हे स्पष्ट करण्यांत येते की, महाराष्ट्र सागरी विकास धोरण-२०१६, ज्यामध्ये शासन निर्णय क्रमांक: धोरण-०५१८/प्र.क्र. १९/बंदरे-१, दिनांक १९ जुलै २०१९ सुधारणा करण्यात आल्या आहेत, अशा महाराष्ट्र सागरी विकास धोरण-२०१६च्या कलम १०.२.२ अन्वये, विद्यमान बंदर प्रकल्पांना लागू करण्यात आलेली आणि त्यांनी घेतलेली गौण खनिजांवरील रॉयल्टीमधून अपफ्रंट सूट, अकृषिक मूल्यमापन शुल्कातून अपफ्रंट सूट, वीज शुल्कातून सूट, मुद्रांक शुल्कातून अपफ्रंट सूट, सार्वजनिक-खाजगी भागिदारी बंदरांना औद्योगिक वीज दर लागू करणे, बांधकाम टप्प्यात आवश्यक इनपुट वरील मूल्यवर्धित करातून (VAT) सवलत आणि बंदर करातून सवलत ही आर्थिक प्रोत्साहने विद्यमान प्रकल्पांना यापुढेही लागू राहतील. प्रोत्साहनांचे कोणतेही दुबारीकरण (Duplication) टाळण्यासाठी हे आहे.

## २३.३ बंदर प्रकल्प आणि विद्यमान प्रकल्पांच्या विस्तारासाठी प्रोत्साहने

(a) जर बंदर प्रकल्प किंवा विद्यमान प्रकल्पांचे ऑपरेटरने प्रारंभिक डीपीआरमध्ये नमूद केल्याप्रमाणे माल वाहतूक अंदाज, कामाचा वाव आणि मास्टर प्लॅन पूर्ण केले आणि नंतर डीपीआर मधील प्रारंभिक कामाचा वाव पूर्ण करण्यासाठी आवश्यक असलेल्या स्थिर भांडवली गुंतवणूकीच्या (FCI) किमान २५% गुंतवणूक करून त्यांच्या सुविधेचा विस्तार केला तर, उच्चाधिकार समिती अशा विस्तारित सुविधेला कलम २३.१(b) अंतर्गत नमूद आर्थिक प्रोत्साहने देऊ शकते.

(b) तथापि, सवलतीच्या कालावधीत किंवा भाडेपट्ट्याच्या कालावधीत हाती घेतलेल्या प्रकल्पाच्या केवळ २ विस्तारांसाठी असे प्रोत्साहन दिले जाईल.

(c) जर कोणत्याही ऑपरेटरने त्याच्या प्रकल्पाच्या विस्तारासाठी, मोठ्या किंवा मेगा पोर्टसाठी आवश्यक असलेल्या किमान स्थिर भांडवली गुंतवणूकीपेक्षा जास्त किंवा समतुल्य गुंतवणूक केली तर, अशी विस्तारित सुविधा देखील कलम २३.१(c) नुसार सानुकूलित प्रोत्साहन पॅकेजसाठी पात्र असेल.

(d) कलम २३.१(d) अंतर्गत नमूद केलेल्या वित्तीय प्रोत्साहनांवरील मर्यादा ह्या कलम २३.३(a) आणि २३.३(c) ह्याखाली करण्यात आलेल्या विस्तारित सुविधेसाठी प्रदान केलेल्या वित्तीय प्रोत्साहनांना जशाच्या तशा लागू होतील.

### २३.४ कोस्टल विशेष आर्थिक परिक्षेत्र आणि कोस्टल इंडस्ट्रीयल कॉरीडॉर यामध्ये स्थापन करण्यात आलेल्या उत्पादक घटकांना द्यावयाची आर्थिक प्रोत्साहने

कोस्टल विशेष आर्थिक परिक्षेत्र आणि कोस्टल इंडस्ट्रियल कॉरिडॉरमधील उत्पादन घटक बंदराच्या पायाभूत सुविधांवर अवलंबून आहेत. त्यांनी केलेली गुंतवणूक आणि रोजगार निर्मिती लक्षात घेऊन, MMDP- २०२३ लागू झाल्यानंतर, विशिष्ट कॉरिडॉरमध्ये स्थापन केलेल्या उत्पादन घटकांना प्रोत्साहन पॅकेज योजना, २०१९ अंतर्गत ते सध्या पात्र असलेल्या प्रोत्साहनांच्या एक-स्तर वरची प्रोत्साहने प्रदान केली जातील. त्याकरिता शासनाचा उद्योग विभाग वेळोवेळी प्रचलित औद्योगिक धोरणातील तरतुदीनुसार आवश्यक आदेश/निर्णय निर्गमित करेल.

### २३.५ कोस्टल शिपिंगसाठी आर्थिक प्रोत्साहने :

(a) महाराष्ट्रातील बंदरांमध्ये किंवा इतर कोणत्याही भारतीय बंदरातून महाराष्ट्रातील बंदरांमध्ये कोस्टल शिपिंगद्वारे नॉन-कॅप्टिव्ह मालाच्या वाहतूकीसाठी राज्य सरकार WFR वर ५०% सवलत देईल.

(b) महाराष्ट्रातील रो-रो/रो-पॅक्स ऑपरेशन्ससाठी राज्य सरकार हाय फ्लॅश हाय स्पीड डिझेलवर (High Flash High Speed Diesel) मूल्यवर्धित करात (VAT) सूट देईल.

### २३.६ शिपयार्डसाठी आर्थिक प्रोत्साहने

**(a)** नवीन शिपयाड्र्सना जहाजबांधणीमध्ये वापरल्या जाणा-या कच्च्या मालाच्या खरेदीसाठी WFR च्या ५०% पर्यंत सूट व्यावसायिक कार्यचालन सुरू झाल्याच्या तारखेपासून पाच (५) वर्षांसाठी प्रदान केली जाईल.

**(b)** **मुद्रांक शुल्कात सूट:** शिपयार्डचा विकास, कार्यचालन, देखभाल आणि विस्तार यासह रस्ते जोडणी, रेल्वे जोडणी, पाणीपुरवठा, विद्युत पुरवठा, दूरसंचार आणि इतर संबंधित क्रियाकलापांशी संबंधित सर्व प्रथम साधनांवर मुद्रांक शुल्क आकारले जाणार नाही.

**(c) SGST सूट**

(i) **बांधकाम टप्प्यात आवश्यक इनपुटसाठी:** शिपयार्डच्या बांधकाम टप्प्यात आवश्यक असलेल्या इनपुट्सवर SGST सूट दिली जाईल.

(ii) **जहाजांच्या विक्रीवर:** महाराष्ट्रातील शिपयार्डमध्ये उत्पादित केलेली जहाजे आणि जलयाने इत्यादींच्या विक्रीवर SGST आकारला जाणार नाही. ही सूट व्यावसायिक कार्यचालन सुरू झाल्याच्या तारखेपासून सात (७) वर्षांच्या कालावधीसाठी असेल.

**(d) शिपयार्डसाठी औद्योगिक वीज दर लागू करण्याबाबत:** शिपयार्डच्या कार्यचालनाच्या तारखेपासून सात (७) वर्षांच्या कालावधीसाठी औद्योगिक वीज दर लागू केले जातील. त्याकरीता ऑपरेटरला महाराष्ट्र सागरी मंडळ/गृह विभाग यांचेमार्फत मा. महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाकडे याचिका दाखल करावी लागेल. मा.आयोगाने मान्यता दिल्यानंतर ही सवलत लागू होईल.

**(e) वीज शुल्काची प्रतिपूर्ती:** बांधकाम टप्प्यात शिपयाड्र्सवर विद्युत शुल्क आकारले जाणार नाही.

**(f)** गृह विभाग हे उच्चाधिकार समिती व मा.मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करून, वेळोवेळी सुधारित करण्यात येणाऱ्या सामूहिक प्रोत्साहन योजना-२०१९ मध्ये निर्दिष्ट केलेल्या मोठ्या व विशाल पायाभूत प्रकल्पांसाठी देण्यात आलेली प्रकल्पनिहाय प्रोत्साहने, MMDP-२०२३ अंतर्गत जहाजबांधणी उद्योगासाठी अनुज्ञेय करण्याबाबत निर्णय घेईल. याबाबत त्या-त्यावेळी प्रचलित औद्योगिक धोरणातील तरतूदीनुसार उद्योग विभागामार्फत योग्य ते आदेश / निर्णय निर्गमित करण्यात येतील.

**(g)** जहाजबांधणी उद्योगात सहभागी होणारे घटक राज्याच्या औद्योगिक धोरणातील आणि केंद्र सरकारच्या बंदरे, नौवहन व जलमार्ग मंत्रालयाच्या जहाजबांधणी आर्थिक सहाय्य धोरणातील (Shipbuilding Financial Assistance Policy) सवलतींचा लाभ घेऊ शकतील.

**२३.७ क्रूझ पर्यटनासाठी आर्थिक प्रोत्साहन:**

(a) महाराष्ट्रातील बंदरांना भेट देणाऱ्या सर्व क्रूझ लाइनर्सद्वारे देय असलेल्या बंदर करावर २५% सवलत दिली जाईल.

(b) क्रूझ लाइनर्समधील प्रवाशांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% इतकी सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

(c) हे स्पष्ट करण्यात येते की वर नमूद केलेली आर्थिक प्रोत्साहने केवळ क्रूझ लाइन जहाजांना लागू होईल आणि रो-रो, फेरी किंवा इतर नियमित प्रवासी सेवांना लागू होणार नाही.

### २३.८ फ्लोटेल्स, हाऊसबोट आणि सीप्लेनसाठी आर्थिक प्रोत्साहने

(a) सर्व नवीन फ्लोटेल्स, हाऊसबोट आणि सीप्लेनद्वारे देय असलेल्या बंदर करावर २५% सवलत प्रदान केली जाईल.

(b) प्रवाशांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

### २३.९ उभयचर बसेस, मासेमारी नौका, हार्बर/ रिव्हर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज यांना आर्थिक प्रोत्साहन

(a) उभयचर बसेस, मासेमारी नौका, हार्बर/रिव्हर क्रूझ आणि फ्लोटींग कॉटेज द्वारे देय असलेल्या बंदर करावर २५% सवलत प्रदान केली जाईल.

(b) प्रवाशांना जारी केलेल्या तिकिटांसाठी प्रवासी करावर ७५% सवलत तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रदान केली जाईल.

(c) उपरोक्त (b) मध्ये नमूद सवलती व्यतिरिक्त, दिव्यांगांना सवलती देण्याबाबतच्या शासनाच्या प्रचलित धोरणानुसार सवलती लागू होतील.

### २३.१० इक्विटी सहभाग

a) जेथे जेथे महाराष्ट्र सागरी मंडळ किंवा राज्य सरकार, यथास्थिती जे असेल ते, सवलत करार किंवा शेअर होल्डिंग करार किंवा भाडेपट्टा करार स्वाक्षांकित करण्याची योजना करत असेल किंवा असा करार स्वाक्षांकित केला असेल आणि अशा करारामध्ये महाराष्ट्र सागरी मंडळ /राज्य सरकार द्वारे इक्विटी सहभागाचा पर्याय उपलब्ध असेल, तर अशा प्रकरणांमध्ये - प्रकल्प प्रवर्तकाव्दारे (सरकारी किंवा खाजगी) घेतलेले प्रोत्साहन (पात्र आणि निवडलेले), करारामध्ये परिभाषित केल्यानुसार इक्विटीच्या शेअरच्या मर्यादेपर्यंत इक्विटी सहभाग म्हणून समजण्यात येईल.

b) परंतु २३.१०(a) मध्ये नमूद केलेला पर्याय महाराष्ट्र सागरी मंडळ/राज्य सरकार द्वारे अशा सवलत करारासाठी वापरला जाऊ शकत नाही जेथे इक्विटी सहभाग घेण्यासाठी सवलत करारामध्ये नमूद केलेला कालावधी संपलेला आहे, आणि जोपर्यंत विद्यमान प्रकल्पाचा विस्तार होत नाही आणि तो प्रकल्प या धोरणामध्ये नमूद केल्यानुसार कलम २३.३ प्रमाणे आर्थिक प्रोत्साहनासाठी पात्र ठरत नाही.

******************